मराठी अनुवादासहित

# महापरित्राण पाठ

अथवा

# चतुभाणवार पालि



*** संपादक ***

**डॉ. भदन्त एन. आनन्द, महाथेरो**

अध्यक्ष - महामहिन्द इंटरनॅशनल धम्मदूत सोसायटी

सुभाष टेकडी, उल्हासनगर - ४२१ ००४

जि. ठाणे

# अर्पण



श्रीलंका महामहिन्द

इन्टरनॅशनल धम्मदुत

सोसायटीचे संस्थापक

माझे परम पूज्य गुरु बद्देगम

विमलवंश नायक, महास्थविर

यांच्या पुण्यस्मृतिस अर्पण

- डॉ. भदंत एन्. आनंद महाथेरो

# अनुक्रमणिका

# तृतीय आवृत्तीकरीता दोन शब्द ...

संपूर्ण महापरित्राण पाठाची तृतीय आवृत्ति आपल्या पुढे प्रस्तुत करतांना मला अत्यानंद होत आहे. गेल्या चार वर्षापासून श्रध्दावान उपासक, उपासिका तसेच आमचे पूजनीय भिक्खू संघाचे अनवरत अपेक्षा मुळेच ही तृतीय आवृत्ति आपल्या समोर प्रस्तुत होत आहे. धम्म हितकामी श्रध्दावान, दानशूर, पूजनीय भिक्खुगण आणि ज्या बौध्द उपासक उपासिकांनी धम्मदान पाठवून ग्रंथप्रकाशनाच्या कार्यासाठी मदत केली, सर्व प्रथम मी त्या सर्वांची कृतज्ञता व्यक्त करू इच्छितो.

ह्या पुर्वी निघालेल्या दोन आवृत्त्यांमधील झालेल्या चुकांची ह्या वेळी पुर्ण शुध्द स्वरूपात दुरूस्ती करण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या कामासाठी तसेच मुद्रण प्रक्रियेसाठी मला बौध्द साहित्यिक आयुष्यमान सुनिल सोनवणे, उल्हासनगर यांनी केलेले श्रम व सहकार्य मी विसरू शकत नाही.

ह्या तीसऱ्या आवृत्तीसाठी काही वर्षापासून वंदनीय भिक्खुसंघ व अनेक उपासक उपासकांनी गेल्या दोन-तीन वर्षापासून प्रकाशनाचा आग्रह केला असला तरी मी तिसऱ्या आवृत्तीच्या प्रकाशनासाठी एवढा उत्सुक नव्हतो व पुनरमुद्रण करावे असे माझ्या मनात आले नव्हते, कारण आमचे काही लोक ह्या कार्याला प्रोत्साहन देण्याऐवजी अंधश्रध्देला थारा देण्याचे कार्य म्हणून आमसभेपुढे सांगत होते. त्या लोकांना ऐवढेच मी सांगू इच्छितो की, त्यांनी प्राचीन बौध्द साहित्याचा व संस्कृतीचा खरा अभ्यास करावा. डॉ. बाबासाहेब श्रीलंकेचा दौरा करून परत येतांना महापरित्राण सोबत घेऊन आले. महापरित्राण पाठातील काही ग्रेमफोन रेकॉर्डस रात्रीच्या वेळी किंवा सकाळी जेंव्हा जेंव्हा त्यांना वाटत होते तेव्हा आपले खाजगी सचिव नानकचंद सुत्तांना ते लावण्यास सांगून ऐकत होते. परित्राण पाठ कर्मकांड किंवा अंधश्रध्देला प्रोत्साहन देणारी बाब असेल तर बाबा साहेबांनी महापरित्राणपाठ सुत्तांचे कधीच श्रवण केले नसते. डॉ. बाबासाहेबांनी भारतीय बौध्द महासभा (The Buddhist Society of India) ह्या संस्थेचे निर्माण करून त्या मार्फत बौध्द संस्कार विधि समाजापुढे ठेवतांना २२ प्रतिज्ञा बरोबर सुत्तपाठ, पूजा पाठ समाजापुढे ठेवले. स्वतःला अतिहुशार समजणारे, धम्म तत्वज्ञानाविषयी अर्ध बुध्दी असणारे, अति पंडित लोक याला काय म्हणतील याचा आपणच विचार करावा.

महापरित्राण सुत्तपाठात काही शब्द व भ्रामक संकल्पना तत्कालीन प्रचलित संस्कृती व भाषेमुळे आल्या असतील, तरी परित्राण पाठाचा हेतू शुध्द आहे. २५५३ वर्षापूर्वीची ही वचने त्रिपिठक व तत्सम ग्रंथातून घेतलेली आहेत. यातील बुध्द वचने ही भाषांतरे व कालानुसार भाषेच्या अपभ्रंशामुळे किंवा बुध्दाला अलौकिकत्व प्राप्त करून देण्याच्या उद्देशामुळे ती येथे आली असल्याने अप्रस्तुत वाटत असली, तरी या तिसऱ्या आवृत्तीमध्ये अशा अनाठाई शब्दांना पर्याय देण्याचा व बुध्दीप्रामाण्य शुध्द अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. मात्र मुळ सुत्तांचा अनार्थ होवू नये याची काळजी घेण्यात आली आहे. परित्राण पाठाकडे विवेक बुध्दीने व श्रध्देने पाहिले की त्याचे प्रयोजन हे उचीत आहे, हे लक्षात येते. परित्राणपाठ हे मंत्र-तंत्र नसून बौध्द संस्कृती व तत्वज्ञानाच्या अभिष्ठ चिंतनाद्वारे व प्रगटीकरणाद्वारे अरिष्ठ दूर करण्यासाठी सद्‌भावनेतून आशिर्वादात्मक मंगलमय वातावरण निर्माण करणे हा परित्राणपाठाचा मुळ उद्देश आहे. हे टिकाकारांनी लक्षात घ्यावे.

# प्रस्तावना

## परित्त परिचय

'परित्त- रक्षणसूत्रांचा महान ग्रंथ' श्रीलंकेत 'महा पिरित-पोत' ह्या नावाने ओळखला जातो. बौध्द विहारात आणि बौध्द उपासकांच्या निवासस्थानी दुष्टप्रवृत्तीला दूर ठेवण्यासाठी आणि समृध्दी प्राप्त करण्यासाठी परित्त सुत्रांचे समारंभपूर्वक संगायन केले जाते. 'परित्त' हा ग्रंथ पाली धम्मसाहित्यातील एक स्वतंत्र असा ग्रंथ नसून पाच निकायांतून निवडलेल्या सूत्रांचा तो एक काव्यसंग्रह आहे. पालीमध्ये ह्या ग्रंथाला 'चतुभाणवार' अशी संज्ञा आहे. महान धर्मग्रंथाच्या आधी निकायाची 'प्रास्ताविक पुस्तिका' म्हणून ह्या ग्रंथाचा मुळ उद्देश असावा. श्रीलंकेतील अभयगिरी विहारात मूळ धरलेल्या महायानपंथाच्या प्रभावामुळे, महाविहारांतील भिक्षूंनी 'महायानी धारिणी' ह्या ग्रंथाची ही स्थळप्रत म्हणून मानली गेली असावी. धारिणी (मंत्र) हा लोकप्रिय बौध्द धम्माचा महत्वपूर्ण भाग आहे. परंतु त्याच्यात बौध्द धम्माच्या लक्षणांच्या दृष्टीने विशेष काहीच नाही. धारिणी (मंत्र) म्हणजे एक सहानुभूतीपुर्वक मंगलकामना जीच्या काही विधीसह उच्चाराने, इच्छित घटना घडू शकते. तपशीलावर आणि योग्य रीतीने म्हटलेल्या या शब्दांच्या (सूत्रांचा) अर्थ सामान्य उपासकांना कळलाच पाहिजे अशी अपेक्षा नसते. केवळ शब्दांचे सामर्थ्य दुष्टपणा नाहीसे करते आणि समृध्दी आणते. धारिणीत अर्थहीन शब्द आहेत, याउलट परित्तातील सूत्रे अर्थपूर्ण आहेत.

त्रिपिटकसंग्रहांतील सुत्तपिटकाच्या पंधरा ग्रंथापैकी 'खुद्दकपाठ' (लघुपाठ) हा प्रथम ग्रंथ आहे. त्यात नऊ लहान सूत्रांचा समावेश झालेला आहे. ह्या ग्रंथात बौध्द गृहस्थाच्या नित्य पठनासाठी निरनिराळ्या पाली बौध्द ग्रंथातील सूत्रांचा समावेश केलेला आहे.

खुद्दपाठासारखा पण आकाराने त्याहून मोठा असा 'परित्त' नावाचा आणखी एक संग्रह पाली बौध्द साहित्यात प्रसिध्द आहे. त्याला 'परित्त' किंवा 'महापरित्त'- 'महापरितपोत चतुभाणवार' हे नाव दिलेले आहे.बौध्द भिक्षू व गृहस्थ यांना रक्षण (सुरक्षा) सुलभतेने प्राप्त करून देण्यासाठी सुत्तपिटिकांतील जवळजवळ एकोणतीस सूत्रांचा हा संग्रह बनविण्यात आला आहे. ह्यापैकी चौवीस सूत्रे वा प्रवचने भगवान बुध्दाने सांगितलेली असून ती सुत्तपिटकाच्या निरनिराळ्या ग्रंथात सापडतात. ह्या सूत्रापूर्वी त्रिशरण, दहा शिक्षापदे, सामणेरप्रश्न, द्वतिंससकार व पच्चवेक्खणा अशी पाच सूत्रे नेहमीच्या पध्दतीप्रमाणे दिलेली आहेत.

'परित्त' 'महापरितपोत-चतुभाणवार' पोथीत समावेश पावलेली बहुतेक सुत्रे दिघनिकाय, मज्झिमनिकाय, संयुक्तनिकाय, अंगुत्तरनियाक व खुद्दनिकाय या सुत्तपिटकाच्या पाचही विभागातून निवडलेली आहेत. या संग्रहातील सूत्रासंबंधी सहज लक्षात येण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यातील पुष्कळशी सुत्रे सुत्तानिपातातून घेतलेली आहेत. ही सर्व सुत्रे बुध्द,

धम्म व संघ यांच्या महानतेचे वर्णन करतात व भिक्षू आणि उपासक या दोन्ही समाजाच्या धार्मिक व सामाजिक आवश्यकता पूर्ण करतात. मंगलसुत्त व रतनसुत्त ही दोन सुत्रे कुटुंबातील व समाजातील निरनिराळ्या व्यक्तींच्या अन्योन्य कर्तव्यांवर प्रकाश टाकतात, त्यांची मने ऊर्ध्वगामी बनवितात (उच्च पातळीवर घेऊन जातात), त्यांच्यात परस्पर प्रेम व बन्धुभाव निर्माण करतात आणि विश्वबन्धुत्व, एकमेकांविषयीची प्रेमभावना, कर्तव्यनिष्ठा व सत्य आणि अहिंसेविषयी परम आदर निर्माण करतात.

प्रवचनांचा (सूत्रांचा) एकत्रित केलेला हा संग्रह श्रीलंकेत 'पिरित पोत' वा 'चतुभाणवार' (सतर भाणवार)'रक्षण पाठाचा ग्रंथ) ह्या नावाने प्रसिध्द आहे. भाणवार म्हणजे संगायनासाठी मूळ धर्मग्रंथातील ह्या हेतूप्रित्यर्थ केलेला प्रवचनांचा संग्रहाचा विभाग. असे म्हणतात की आठ अक्षरांतून तीन शब्दांचे पद निर्माण होते, चार पदांची एक गाथा होते, आणि २५० गाथांचा एक भाणवार होतो. हा चतुभाणवार ग्रंथ श्रीलंकेतील पूर्वीच्या आचार्यांनी निर्माण केला असून, श्रीलंकेतील बौध्द लोक त्याला 'पिरितपोत' (रक्षणग्रंथ) असे म्हणतात. प्रस्तुत सुत्रे रक्षण करणारी सुत्रे म्हणून भगवंतांनी सांगितलेली असून हा रक्षणलाभ ह्या सूत्रांचे पणन वा श्रवण करून प्राप्त करायचा असतो. ही गाथा बौध्दधम्माच्या इतिहासाच्या प्रथमकालापासून सुरू झालेला आहे. ह्याचा संदर्भ आपल्याला विनयपिटकाच्या चुल्लवग्गात 'खन्दपरित्तं' ह्या प्रवचनात आणि अंगुत्तरनिकायाच्या 'अहिसुत्ता' त आढळून येतो. ह्या सूत्रात भिक्षूंनी सर्व प्राणीमात्रांच्या बाबतीत 'मेत्ता' (मैत्री भावना) निर्माण करावी असा उपदेश केला आहे. शिवाय ह्या सूत्राचा उपयोग रक्षण आणि रक्षा करण्यासाठी भिक्षूंनी करावा अशी भगवंतांनी शिफारस केली आहे.

'परित्त' हा पाली शब्द संस्कृत भाषेतील 'परित्र' किंवा 'परित्राण' या शब्दाप्रमाणे रक्षण, सुरक्षितता, संगोपन हे अर्थ सुचवितो. कारण की या परित्त नामक ग्रंथात समावेश पावलेल्या सूत्रांचे पठन (संगायन) किंवा चिन्तन (मनन) अमुक खास प्रसंगी केले असता, त्यामुळे सर्वसामान्य सुरक्षिततेचे, सभ्दवाचे, मंगलतेचे वातावरण उत्पन्न होऊन असुरक्षितता, आतंक, भय, मानसिक तणाव दूर होतात व शुभता, शुचिर्भुतता व शुभचिन्तनाचे वातावरण निर्माण होते, अशी बौध्द भिक्षू व उपासकांची मान्यता आहे.

'परित्त' शब्दाचा विस्तृत अर्थ रक्षण, रक्षा, संगोपन, अनुपालन असा आहे. ही सूत्रे (स्तोत्रे) बौध्द भिक्षू व उपासक प्राचीन परंपरेप्रमाणे निरनिराळ्या प्रसंगी सर्वसामान्य सुरक्षा, निर्भयता, व शुभता प्राप्त करण्यासाठी, भूत, प्रेत, यक्ष व पिशाच्च, तसेच अशुभ नक्षत्रे, नैसर्गिक आपत्ती (रोगराई, दुष्काळ) व समाजकंटकापासून निर्माण होणारे भय दूर करण्यासाठी, सुरक्षा व सुव्यवस्था आणि शांतता यांचे वातावरण निर्माण करण्यासाठी, यांचे सामुदायिक पठन व संगायन करीत असत व आजही श्रीलंका, ब्रम्हदेश व थायलंड सारख्या बौध्द देशात ती परंपरा पाळली जाते.

# परित्ताचा रचनाकाल आणि इतिहास

'परित्त' ग्रंथाला सिंहली भाषेत 'सतर भाणवार' आणि पालीत, 'चतुरभाणावार पालि' असे म्हणतात. त्याचा अर्थ 'चार आख्याने' (संगायने) हा ग्रंथ अनुराधापूर काळात अस्तित्वात होता आणि अशी पध्दती होती की तरूणांना भिक्षूची दीक्षा प्राप्त करण्यापूर्वी हा ग्रंथ तोंडपाठ करावा लागत असे. म्हणून त्याला सिंहली भाषेत 'पिरूवान पोत' (किंवा पिरूवान पोत वहसे) किंवा, तोंडपाठ करण्याचा ग्रंथ असे म्हणत. 'चतुभाणवारपालि' ग्रंथाची अशी रचना केव्हा झाली ही आपल्याला माहीत नाही. काहींचा असा विश्वास आहे की प्रथम धम्मसंगीतीची सांगता झाल्यावर, त्या संगीतीच्या प्रतिनिधींनी अशी रचना केली असावी. काहींचे असे मत आहे की अनुराधापुर काळातील कोण्या एका स्थविराने हा ग्रंथ संकलित केला असावा. श्रीलंकेत पाचव्या शतकात वास्तव्य करणाऱ्या बुध्दघोस नामक साहित्यकाराने श्रीलंकेत येण्यापूर्वी परित्तग्रंथावर परित्तअट्ठकथा लिहिण्यास सुरूवात केली. मात्र ती टीका अस्तित्वात नसल्याकारणाने सध्याच्या परित्तग्रंथावरील ती टीका होती की नाही हे आपल्याला सांगता येत नाही. ह्याशिवाय श्रीलंकेत आणि ब्रह्मदेशात परित्तग्रंथावर टीका लिहिल्या गेल्या. परंतु त्याद्वारे आपल्याला विश्वसनीय माहिती प्राप्त होत नाही. चतुभाणावार पालि-परित्त हा ग्रंथ श्रीलंकेत महाथेरांनी (पोराणआचार्यांनी) रचला असून आज श्रीलंकेतील बौध्दजनांत पिरितपोत रक्षणग्रंथ म्हणून ओळखला जातो.

परित्तपाठाची रचना केव्हा (कोणत्या समयी) झाली ते निश्चितपणे सांगणे सोपे नाही, पण एक गोष्ट नक्की की परित्तपाठाची रचना त्रिपिटकाच्या ग्रंथाच्या रचनेनंतर बऱ्याच वर्षांनी परंतु मिलिन्दप्रश्न ग्रंथाच्या रचनेपुर्वी झाली असावी. परित्तपाठाच्या सर्वप्रथम उल्लेख 'चुल्लवग्गामध्ये' सापडतो. कारण त्यात असे वर्णन वाचावयास मिळते की एका भिक्षूचे सर्पदंशाने मरण झाले असता भगवान बुध्दाने सुरक्षेचे वातावरण निर्माण करण्यासाठी 'खन्दपरित्ता' चा पाठ करण्याची अनुमती दिली. स्थविरवादाच्या प्रारंभाच्या परंपरेत भूतप्रेताच्या बाधेपासून मुक्त होण्यासाठी मंत्रतंत्र किंवा जादूटोणा करण्याची परंपरा नव्हती. पण नंतरच्या काळात आधारित अशा या गोष्टींचा प्रवेश उत्तरकालात झाला असावा. दीघनिकायातील आटानाटीय सूत्रांतील अंधविश्वासासंबंधीचे भाग उत्तरकालीनच समजले पाहिजे. भगवान बुध्दाने तर योगाच्या विभूतिप्रदर्शनाची निन्दा करून त्याची गणना दुष्कृत अपराधात केलेली आहे. असे असताना स्थविरवादी परंपरेत जादूटोण्याच्या समर्थनाची अपेक्षा करण्यात अर्थ नाही. पटिच्चसमुप्पादाच्या आधारावर सर्व घटनांचा अर्थ लावणारा भगवान बुध्दाचा धम्म मंत्रांच्या जपाने रोग किंवा इतर संकटापासून मुक्ती देण्यासाठी अवतरला नव्हता.

'महावंस' ग्रंथानुसार श्रीलंकेचे नरेश पहिले उपतिस्साच्या वेळी (इसवीसन चौथ्या शतकाच्या अंती) श्रीलंकाद्विपात दुष्काळ व रोगराईचा प्रादुर्भाव झाला होता. त्यावेळी भिक्षुसंघाने राजाला कळविले की बुध्दकाळात वैशाली नगरात अशाच प्रकारचा दुष्काळ, रोगराई आणि भयावस्था निर्माण झाली होती. तेव्हा भगवान बुध्दाने 'रतनसुत्ताचे' पठन

केले आणि आनंद स्थविराने ह्या सूत्राचे पठन करीत आणि भगवान बुध्दाच्या भिक्षापात्रातून जलाचा शिपडावा करीत सर्व नगराचा फेरफटका केला. परिणामी सर्व लोकांचे अरिष्ठांपासून रक्षण केले गेले.

हे ऐकून त्या राजाने बुध्दांची सोन्याची मुर्ती तयार केली, दगडाचे भिक्षापात्र तयार केले व ते पाण्याने भरले. ह्या वस्तू हातात घेऊन त्याने त्या रथात ठेवल्या. राजाने महादान देऊन लोकांना दहा शिक्षापदे ग्रहण करण्याचा आदेश दिला आणि स्वतः देखील शिक्षापदे ग्रहण केली. सर्व नगर सुशोभित करून सर्व भिक्षू रथामागून रतनसुत्ताचे पठन-गायन करीत आणि जल शिंपडीत सर्व रात्रभर रस्त्यावर भटकून त्यांनी रक्षणगीतीचा पाठ केला. ह्या समारंभाला 'गंगारोहण' असे संबोधितात. असे म्हणतात की ह्या समारंभानंतर पाऊस पडला आणि सर्व दुर्भिक्ष व रोगराई नष्ट झाली.

तथापि, श्रीलंकानरेश चौथे अग्गबोधि (इ.स. ६५८-६७४) च्या कारकिर्दीत परित्त सूत्रांच्या समारंभापूर्वक पठनासंबंधी प्रथम संदर्भ मिळतो. मात्र समारंभाचा तपशील वा कारण ह्या संबंधीची माहिती आपल्याला मिळत नाही.

ह्या नंतरच्या काळात नरेश दुसरे सेन (इ.स. ८५१-८८५) च्या कारकिर्दीत सुध्दा असा समारंभ आयोजित केला गेला. ह्यावेळी बुध्दाच्या मूर्तीऐवजी आनंद स्थविराची मूर्ती रथात ठेवण्यात आली. कारण वैशाली नगरचा फेरफटका रतनसुत्ताचे पाठ करीत आणि जल शिपडीत आनंद स्थविराने केला होता.

पुढे पाचवे कश्यप नरेश (इ.स. ९१३-९२३) च्या कारकिर्दीत त्यांनी संघाला परित्त पाठांचे पठन करावयास सांगून नगरातील महामारीचे संकट दूर केल्याचा संदर्भ आपल्याला प्राप्त होतो.

परित्तपाठाची परंपरा बौध्द धर्माच्या इतिहासात सुरवातीपासून चालू झाली आणि ती थेट आजपर्यंत निरनिराळ्या देशांमध्ये बौध्द धर्मीयांच्या व्यक्तिगत व सामाजिक जीवनात साजरे केल्या जाणाऱ्या महत्वाच्या समारंभामध्ये त्या परंपरेने मानाचे स्थान प्राप्त केले आहे.

अशा रितीने बौध्द देशामध्ये रोगराई, दुष्काळ, हिंसक पशु, अशुभ नक्षत्रे, कलह, मानसिक अशांतता, असुरक्षिततेची भावान यासारख्या अनिष्ट गोष्टींपासून मुक्त होण्यासाठी व दीर्घ आयुष्य, उत्तम आरोग्य, धनधान्यसमृध्दी, मानसिक समाधान व स्थैर्य प्राप्त करून अशुभ व अहितकारी शक्तींवर विजय मिळविण्यासाठी परित्त पाठांचे पठन, सांगायन, श्रवण, मनन व चिन्तन करण्याची प्रथा बौध्दधर्माच्या इतिहासात फार प्राचीन काळापासून रूढ झालेली आहे व संकटरूपी अंधारातून प्रकाशरूपी सुरक्षिततेकडे जाण्यासाठी बौध्द उपासक परित्तपाठाचा अवलंब करून आत्मविश्वास निर्माण करून सुरक्षिततेची भावना प्राप्त करतात, मनाला शांत बनवितात आणि द्विगुणीत उत्साहाने भगवान बुध्दाच्या उपदेशांचे अनुसरण करून आपले ऐहिक जीवन सुखी बनवून आपली पारमार्थिक प्रगती साधण्याचा प्रयत्न करतात.

# परित्ताचे संगायन

'परित्त (पिरितपोत-चतुभाणवार) ग्रंथात खुद्दकपाठातील सात पाठांचा समावेश झालेला आहे. त्यावरून असे स्पष्ट दिसते की, ज्याप्रमाणे बौध्द भिक्षू उपोसथाच्या दिवसीच्या भिक्षूंच्या बैठकीत (सभेत) खुद्दकपाठाचे पठन करून आपली भगवान बुध्द, त्याने उपदेशिलेला धर्म व भिक्षुसंघातील परम निष्ठा व श्रध्दा व्यक्त करून, भगवान बुध्दाच्या धार्मिक आणि नैतिक उपदेशांचे पालन करण्याची आपली कटिबध्दता व्यक्त करून आपले धार्मिक व नैतिक जीवन सबळ व अर्थपूर्ण बनवून उत्तरोत्तर उन्नती करण्याचा प्रयत्न करीत असत, तसेच बौध्द भिक्षू आपल्या मूळ परंपरेप्रमाणे उपोसथाच्या दिवशी (दोन अष्ठमी, पौर्णिमा व वद्य चतुर्दशी) भिक्षुसमागमात खुद्दकपाठातील सूत्राचे संगायन करून आपल्या आदर्शाविषयाची जागृती पुन्हा पुन्हा दाजी करीत असत. त्याचप्रमाणे त्यांचे अनुकरण करणारे उपासक जेव्हा जेव्हा काही कारणाने निरनिराळ्या सामाजिक व धार्मिक प्रसंगी एकत्र येत त्या वेळी परित्तातीलसूत्रांचे पठन करीत असत. जन्ममरण, आवाहविवाह, घराची पायाभरणी, अभिनंदन समारंभ, कौटुंबिक मेळाळे, नैगसिर्गक आपत्ती व रोगराईपासून मुक्ती मिळविण्यासाठी आयोजित केलेले समारंभ, दर महिन्यास येणारे चार उपोसथ दिवस ते आशीर्वाद देण्याचे समारंभ अशा प्रसंगी परित्त ग्रंथातील सूत्राचे पठन (संगायन) करून शांत, पवित्र, उत्साहवर्धक व आत्मविश्वासाची प्रेरणा देणारे, निर्भय असे शंकाकुशंकाविरहित वातावरण निर्माण करीत असत.

परित्तात समाविष्ट झालेली सूत्रे नैतिकतेच्या उपदेशाने ओतप्रोत भरलेली आहेत. त्या वस्तुतः असे काहीही नाही, ज्यात उदात्त गंभीरता (गांभीर्य) अस्तित्वात नाही. अशा सूत्राचे पठन निश्चितपणे उच्च आध्यात्मिक अवस्थेकडे घेऊन जाण्यास समर्थ होते. म्हणून तशा परित्तसूत्राचे संगायनांतील सर्व अवस्थांमध्ये मंगलताच असू शकते. रोगाच्या आपत्तीत परत्तिपाठ मानसोपचाराचे काम करीत असावा. परित्तसुत्रांची भावना मंगलमय व उदात्त आहे. थोडक्यात, या सूत्रांमध्ये अभिधर्माचे सिध्दान्त किंवा बौध्द धम्माच्या तत्वज्ञानाच्या मूल सिध्दान्ताची चर्चा किंवा प्रतीत्यसमत्पादाचे विवेचन करण्याचा प्रयत्न केलेला नाही. हा लहानसा ग्रंथ श्रध्दापूर्वक, निष्ठेने आणि भक्तीभावाने बौध्द धम्मीयांच्या नैतिक उपदेशाचे पालन करू इच्छिणाऱ्या भाविक उपासकांसाठी एका नित्यपाठाच्या आदर्श पोथीच्या स्वरूपाचा आहे.

परित्तसूत्रांमध्ये असलेल्या मंगल व उदात्त भावनांमध्ये चित्ताला ओतप्रोत केल्यावर शरीर आणि मन प्रसन्नतेने भरून गेल्याशिवाय राहणार नाही आणि प्रसन्नता तर स्वास्थ्य आणि मांगल्य यांची जननी आहे आणि म्हणूनच भिक्षूगण परित्तपाठाच्या अन्ती संगायन करतात -

**''सब्बीतियो विवज्जन्तु, सोकोरोगो विनस्सतु ।**
**मा ते भवतु अन्तरायो, सुखी दिघायुको भव'' ।।**

(तुझी) सर्व संकटे दूर होवोत, (तुझे) सर्व दुःख व रोग नष्ट होवोत.
(तुला) विघ्नबाधांचा आघान होवो, (तु) सुखी आणि दीर्घायुषी होवोस.

# परित्तांची पठनक्रिया

परित्तग्रंथ सिंहलद्वीप (श्रीलंका) आणि इतर बौध्द देशांतील अतिशय सुप्रसिध्द व लोकमान्य असा पालि ग्रंथ आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही, म्हणूनच त्याला बौध्दांचे श्रध्दास्थान म्हणण्यास हरकत नाही. बौध्द देशांमध्ये या लहानशा ग्रंथाला बहुजनसमाजात मानाचे स्थान प्राप्त झालेले आहे. या पुस्तकाची प्रत दरेक कुटुंबात आदरपुर्वक मोठ्या काळजीने पवित्र स्थानी ठेवलेली असते आणि कुटुंबातील सभासद त्या पुस्तकातील मंगलसूत्र, रतनसूत्र व मेत्तसूत्रासारखी काही सूत्रे मुखोद्गत करून त्याचे वारंवार पठन व मनन करतात आणि भगवान बुध्द, त्याने उपदेशिलेला धम्म व भिक्षुसंघ यांच्यावरील आपली श्रध्दा व्यक्त करून त्यांच्यावरील आपला विश्वास व त्यांच्याबद्दल आपल्या मनात असलेला आदर सुदृढ बनवितात. कुटुंबातील मुलामुलींना सुध्दा ह्या सूत्रांचा परिचय असतो. कारण ते आपले आई-वडील व वयस्करांकडून किंवा धम्मशाळेतून ही सूत्रे शिकतात.

ज्यावेळी बौध्द भिक्षूंना ऊपासकाच्या निवासस्थानी घरगुती महत्वाच्या प्रगंगी म्हणजे, वाढदिवस, गृहप्रवेश, आजारपण, रोगराईच्या संकटाचा प्रतिकार करण्यासाठी आयोजित केलेला धार्मिक समारंभ इत्यादी प्रगंगी निमंत्रित केले जाते. त्यावेळी अशी एक प्रथा आहे की तीन लोकप्रिय सूत्रांचे- मंगलसूत्त, रतनसूत्त आणि करणीयमेत्तसुत्त ह्यांचे पठन गायन केले जाते. शिवाय बौध्द भिक्षू नेहमी परित्त पोथीतील महत्वाच्या सूत्राचे हमखास पठन करून उपासकांना त्यांनी तशी विनंती केल्यावर थोडासा धम्मोपदेश करतात.

श्रीलंकेतील लोकांच्या घरगुती आणि सामाजिक जीवनात पिरित-समारंभ हा अर्थपूर्ण विधी आहे. कोणताही उत्सव वा कार्यक्रम, धार्मिक व सामाजिक, परित्ताचे संगायन झाल्याशिवाय त्याची सांगता होत नाही. अशा विविध प्रसंगी, भिक्षूंना परित्तसूत्रांचे निरूपण अल्प कालावधीसाठी नाही तर संबंध रात्रभर व तीन किंवा सात दिवस, कधी कधी अनेक सप्ताह करण्यासाठी निमंत्रित केले जाते. अशा प्रसंगी परित्तसंगायन करणाऱ्या भिक्षूंची व्यवस्ता करण्यासाठी एक शमियाना (परित्तमण्डप) उभारला जातो. भिक्षूंना औपचारिकरित्या परित्ताचा उद्देश कथन करणाऱ्या खालील तीन गाथा म्हणून निमंत्रित करतात.

**विपत्ति पटिबाहाय, सब्बसम्पत्ति सिध्दिया ।**
**सब्बदुक्खविनासाय, परित्तं ब्रुथ मंगलं ।।१।।**

(सर्व) विपत्तींचे निर्मुलन करण्यासाठी, सर्व प्रकारच्या संपत्तीच्या प्राप्तीसाठी, सर्व प्रकारच्या दुःखाचा नाश करण्यासाठी, (हे भन्ते) कृपया आपण कल्याणकारक परित्राण पाठ करावा.

**विपत्ति पटिबाहाय, सब्बसम्पत्ति सिध्दिया ।**
**सब्बभयविनासाय, पत्तिं ब्रुथ मंगलं ।।२।।**

(सर्व) विपत्तींचे निर्मुलन करण्यासाठी, सर्व प्रकारच्या संपत्तीच्या प्राप्तीसाठी, सर्व प्रकारच्या भयाचा उच्छेद करण्यासाठी, (हे भन्ते) कृपया आपण कल्याणकारक परित्राण पाठ करावा.

**विपत्ति पटिबाहाय, सब्बसम्पत्ति सिध्दिया ।**
**सब्बरोगविनासाय, पत्तिं ब्रुथ मंगलं ।।३ ।।**

(सर्व) विपत्तींचे निर्मुलन करण्यासाठी, सर्व प्रकारच्या संपत्तीच्या प्राप्तीसाठी, सर्व प्रकारच्या रोगांचा विनाश करण्यासाठी, (हे भन्ते) कृपया आपण कल्याणकारक परित्राण पाठ करावा.

नंतर साधारणपणे बारा वा चौदा निमंत्रित भिक्षू, तीन लोकप्रिय सूत्रांचे पठन-गायन करतात. तदनंतर भिक्षूंची एक जोडी राहिलेल्या सूत्रांच्या संगायनाला सुरूवात करतात. ते दोन तास चालते. दोन तासानंतर ते भिक्षू विश्रांतीसाठी निवृत्त होतात आणि दुसरे दोन भिक्षू ते पठनकार्य पुढे चालू ठेवतात. दोन भिक्षूंनी सतत पठन करायचे असते. अशा रीतीने ते पठन दुसऱ्या दिवशी पहाटेपर्यंत चालू राहते.

ज्यावेळी संगायन चालू असते त्यावेळी भिक्षूंच्या समोर एका टेबलावर पाण्याने भरलेले भांडे ठेवलेले आढलते. ह्या टेबलावखर एक पवित्र दोरा (पिरितनुल) ठेवलेला असतो. सर्व रात्रभर होणाऱ्या पिरित (परित्त) समारंभासाठी, बुध्दाचे पवित्र अवशेष असलेला करंडा (अस्थि-कलश) आणि ओला (एक प्रकारच्या) पानावर लिखित 'परित्त-पोत' वा 'रक्षणसूत्रांच्या ग्रंथाची (परित्ताची)' एक सुशोभित प्रत तेथे जमलेल्या श्रोत्यांच्या दर्शनासाठी सर्वांना सहज दिसू शकतील अशा रितीने ह्या वस्तु मंडपात आणून ठेवल्या जातात. पवित्र अवशेष बुध्दाचे प्रतिनिधित्व दर्शवितो, पिरित-पोत (परित्त ग्रंथ) धम्माचे प्रतिनिधित्व करतात. अशा रितीने परित्त समारंभात श्रोतृ वृन्दाचा (उपासकांचा) बुध्द, धम्म, संघ ह्या रत्नत्रयीशी प्रत्यक्ष संपर्क साधला जातो.

संपूर्ण मंडपाच्या आतील बाजूला सभोवती दोरा बांधला जातो आणि त्याचे शेवटच टोक करंड्याच्या सभोवती, पाण्याच्या भांड्याच्या गळ्याभोवती गुंडाळले जाते आणि ओलापानाच्या ग्रंथाच्या दोरीला बांधले जाते.

ज्यावेळी विशेष सूत्रांचे संगायन चालू असते त्यावेळी भिक्षू दोरा पकडून ठेवतात. पाण्यापासून पवित्र अवशेषापर्यंत-पिरित पोता (परित्तग्रंथा) पर्यंत आणि अधिकृतरित्या पठन करणाऱ्या भिक्षूपर्यंत (बुध्द, धम्म, संघ त्रिरत्न ह्यांच्याशी) अतूट संबंध ठेवणे हा उद्देश असतो. त्रिरत्न आणि पाणी ह्यांना जोडलेल्या दोऱ्याला गुंडाळून सैल सोडला जातो आणि तो (जमिनीवरील चटईवरील) बसलेल्या श्रोत्यापर्यंत पोहचविला जातो. संगायन चालू असेपर्यंत ते दोरा पकडून राहतात.

पहाटे ज्यावेळी संपूर्ण पाली परित्तग्रंथाचे संगायन संपते, त्यावेळी संगायनाचे पवित्र झालेला दोरा अनेक तुकड्यात भिवागला जातो आणि भाविकांना जे तुकडे वाटण्यात येतात. भाविकवर्ग आपल्या मनगटावर वा गळ्याभोवती तो तुकडा बांधतात. त्याचवेळी पवित्र केलेले पाणी सर्व लोकांवर शिंपडले जाते, ज्या परित्ताचे संगायन झाले त्याच्या रक्षण शक्तीची चिन्हे म्हणून ह्या वस्तूंना मानण्यात येते. आशीर्वादासाठी मन वळविणारी ही सेवा आहे आणि तिथे मनोवैज्ञानिक परिणाम निश्चितपणे होत असतात.

# परित्त संगायनाचे लाभ

परित्त पाठांचे पठन (संगायन) केल्याने पाठ करणाऱ्यांची व त्या पाठांचे श्रवण करणाऱ्यांची मने शांत, निर्मल व पवित्र बनतात आणि त्यांच्या मनात बुध्दाच्या उपदेशासंबंधी भरपूर श्रध्दा, विश्वास आणि आदर उत्पन्न होऊन ते सर्वजण स्वतःच्या सुख, शांती, आरोग्य, सुरक्षितता आणि निर्भयतेसंबंधी निश्चिंत होतात व स्वतःच्या मनातील उदासीनता, वैफल्य व असुरक्षिततेच्या भावनांवर विजय प्राप्त करतात.

संकटसमयी भयमुक्त होण्यासाठी, मनाची स्थिरता टिकवून ठेवण्यासाठी, आपल्या प्रयत्नांना सुदृढ करण्यासाठी व नैतिक आचारावरील आपला विश्वास बलवान करण्यासाठी बौध्द भिक्षू व उपासक 'परित्ता' तील सूत्रांचे श्रवण, पठन, संगायन, मनन आणि चिन्तन करून आपल्या आत्मविश्वासाला सुदृढ बनवून नैतिक आचारावरील आपल्या निष्ठेच्या साहाय्याने आपली मानसिक शक्ति वृध्दिंगत करून आपल्या मनातील भय, आशंका व निरूत्साह यांच्यापासून मुक्ति मिळवून, आपले दैनंदिन जीवन श्रध्दापूर्वक, आत्मविश्वासाने व निर्भयपणे जगण्याची प्रेरणा प्राप्त करतात व आपल्या मनातील क्लेशजनक शंकाकुशंका, भीरूता, मानसिक तणाव, व्यथा व साशंकता यांच्यापासून सुटका करण्याचा प्रयत्न करतात.

या परित्त पाठांचे पठन केल्याने अभिभावकाला रोग, दुर्भिक्ष, आतंक, भूतप्रेतबाधा, मानसिक दुर्बलता, घोर निराशा, मानसिक यातना, निरूत्साह, आत्मविश्वासाच्या अभावाने निर्माण होणारी असहाय मानसिक चिन्ता वगैरे उपद्रवांपासून मुक्ती मिळाल्याने मानसिक शांती व आश्वासन प्राप्त होते आणि सामान्य मंगलकारी व शुभ वातावरण निर्माण होते, असा बौध्द धर्मानुयांचा विश्वास आहे. श्रीलंका व ब्रह्मदेश या देशांमध्ये परित्तपाठांची प्रथा प्राचीन काळापासून प्रचलित आहे. या देशांमध्ये कित्येक राजांनी परित्तपाठांचे आयोजन केल्याचे वर्णन निरनिराळ्या ग्रंथात वाचावयास मिळते. ब्रह्मदेशामध्ये तर या पुस्तकाइतके दुसरे कोणतेही लोकप्रिय पुस्तक सापडणे कठीण आहे.

परित्तपाठाच्या 'उपयुक्ततेसंबंधी पाली साहित्यांतील निरनिराळ्या ग्रंथामध्ये विविध प्रसंगाचे वर्णन वाचावयास मिळते. एकदा लिच्छवींच्या वैशाली नगरात अनावृष्टीचे (दुर्भिक्षाचे) संकट आले होते. तेव्हा भगवान बुध्दाच्या आदेशाप्रमाणे लिच्छवींनी परित्तापाठ केला आणि त्यामुळे जोराचा पाऊस पडला व त्यांच्यावरील संकट टळले. परित्तपाठामुळे रोगापासून मुक्ती मिळाल्याची अनेक वर्णने बौध्द ग्रंथात वाचावयास मिळतात. बोज्झंगसूत्राचे पठन केल्याने महाकाश्यप भिक्षू रोगमुक्त झाला. गिरिमानन्द भिक्षूला रोगमुक्त करण्यासाठी भगवंतांनी आनन्दाला गिरिमानन्द भिक्षूकडे जाऊन 'दससञ्ञासुत्त' (अनित्य संज्ञा, अशुभ संज्ञा, अनात्मसंज्ञा, निरोधसंज्ञा वगैरे पठन करून) त्याला रोगमुक्त करण्याचा आदेश दिला होता. 'मिलिन्दपञ्हो' ग्रंथात तर परित्ताचा उल्लेख भगवान बुध्दाचा उपदेश म्हणून केलेला आहे व इतर सात परित्तांचा उल्लेख केला आहे. एकंदरीत पाहता असे दिसते की स्थविरवादी परंपरेत परित्तपाठाचे महत्व व परंपरा सुप्रतिष्ठित झालेली आहे.

# परित्तांची (रक्षणपाठांची) मौलिकता

अलिकडच्या काळात वैद्यकिय शास्त्र, प्रायोगिक मानसशास्त्र आणि संमानसशास्त्र क्षेत्रात जे संशोधन झाले आहे त्यामुसार 'मनाची प्रकृती आणि जगातील त्याचे स्थान' ह्याविषयी आपल्याला बरीच माहिती मिळते. वैद्यकीय शास्त्रानुसार बरेचसे शारीरीक आणि क्रियात्मक रोग हे मानसिक अवस्थेमुळे होत असतात. ज्यावेळी शरीर आजारी होते,त्यावेळी त्याला ताब्यात ठेवणाऱ्या मनाला गुप्तपणे ते शरीर आजारी पडावे असे वाटते वा मन अशा एका त्रस्त अवस्थेत असते की शरीराला रोगापासून अलिप्त ठेवू शकत नाही.

मन ज्याप्रमाणे शरीराला आजारी पाडते, त्याप्रमाणे ते शरीराला बरोबर देखील करते. एखाद्या चिंताग्रस्त आणि दुःखी रुग्णापेक्षा आशावादी रूग्ण लवकर बरा होऊ शकतो. श्रध्देद्वारा शारीरिक रोग बरे झाल्याची अनेक उदाहरणे दिसून येतात.

ह्या संदर्भात बौध्द धम्माच्या देशात धम्मपठनाचे किंवा बुध्दधम्माचे श्रवण करून आजार व आपत्ती ह्यांना दूर ठेवणे, दुष्टांचा प्रभाव दूर ठेवणे, दुष्टप्रवृत्तीपासून संरक्षण आणि मुक्ती मिळविणे आणि आरोग्य, समृध्दी, कल्याण आणि कुशल सुस्थिती ह्याची जोपासना करणे, ह्यासाठी रक्षणपाठाचा धम्मश्रवण करणे, ही प्रथा फार प्राचीन काळापासून अस्तित्वात आहे. अशा प्रकारची निवडक सूत्रे ज्याचे पठन-श्रवण केले जाते, त्या सूत्रांच्या संग्रहाला परित्तसुत्रे (रक्षणगीते) असे म्हणतात. ही जादूची पध्दती नाही किंवा रक्षणमंत्र नव्हेत, त्यांच्यात रहस्यमय असे काहीच नाही. हे सद्‌भावनाचे शब्द सामर्थ्य आहे.

परित्तसूत्त पठनाचे समंजसपणे श्रवण करणारे आणि बुध्दधम्माच्या सत्यावर श्रध्दा ठेवणाऱ्या व्यक्तींना परित्तपठनामुळे मानसिक सुस्थिती प्राप्त होते. अशा प्रकारच्या मानसिक सुस्थितीमुळे जे रोगग्रस्त आहेत, त्यांना बरे होण्यास मदत होते. आणि त्याचप्रमाणे सुख आणणारी आणि दुःख नष्ट करणारी मानसिक प्रवृत्तीदेखील अशा तऱ्हेने तयार होते. सुरवातीला बुध्दाने कथन केलेले परित्तपाठ ज्यांनी ऐकले आणि काय म्हटले जाते ह्याचा अर्थ कळल्यावर, त्या लोकांवर चांगला परिणाम झाला. बुध्दाने दुसऱ्यासाठी व स्वतःसाठी परित्तपाठाचे पठन करवून घेतले. म्हणून बौध्द देशात ही प्रथा आजतागायत प्रचलित आहे.

बुध्द आणि अर्हतपद प्राप्त केलेले त्यांचे भिक्षू दुसऱ्याची मदत न घेता परित्तसूत्रावर ध्यान करू शकतात. परंतु ज्यावेळी ते रोगग्रस्त असतील, त्यावेळी दुसऱ्यांनी पठन केलेले श्रवण करण्यास सोपे जाईल आणि अशारितीने धम्माचा विचार करण्याऐवजी सूत्रांत कथन केलेल्या धम्मावर लक्ष केंद्रीत करणे सोईचे होत असे. मनाला दुर्बल करणाऱ्या अनेक प्रसंगाच्या वेळी स्वयंसूचनेपेक्षा, दुसऱ्याने केलेल्या सूचना अधिक प्रभावशाली ठरलेल्या आढळतात.

बुध्दाच्या शिकवणुकीनुसार मन हे शरीराशी अत्यंत निकटपणे जोडलेले आहे. मानसिक स्थितीचा शरीराचे आरोग्य व कुशलता ह्यावर परिणाम होऊ शकतो. वैद्यकिय शास्त्रानुसार केवळ शारीरीक रोग असा प्रकार नसतो. तर प्रत्येक शारीरिक रोगाचा, मानसकि अवस्थेशी संबंध असतो. त्याला मानसिक कारण असते. बौध्दांच्या कर्मवादानुसार मानसिक अकुशल अवस्था स्वतःच्या अकुशल कर्माच्या परिणामामुळे होत असतात आणि अकुशल कर्मविपाक बदलता येत नाहीत. त्यामुळे मानसिक अवस्थाच बदलणे शक्य असते, ज्यामुळे आरोग्य आणि शारीरिक सुस्थिती प्राप्त होते.

## सत्याचे सामर्थ्य

परित्त पठनाच्या सामर्थ्यासाठी अनेक बाबी एकत्र याव्या लागतता. परित्तपठन-परित्तनिरूपण ही एक सत्यक्रिया आहे, सत्य विधान आहे. अशा प्रकारच्या सत्यविधानाच्या सामर्थ्याने रक्षण प्राप्त होऊ शकते. ह्याचा अर्थ असा की, स्वतःचा अर्थ (लाभ) प्राप्त करण्यासाठी, ह्या सत्यवचनाच्या सामर्थ्यात प्रस्थापित करणे. प्रत्येक सूत्रपठनाच्या अंती, पाठक (आख्याता) श्रावकांना असा आशीर्वाद देतो - 'ऐतेन सच्चवज्जेन सोत्थि ते होतु सब्बदा' ''ह्या सत्याच्या सामर्थ्याने तू सर्वकाळ सुखी होवोस'. धम्मो हवे रक्खति धम्मचारि- धम्मपालणाऱ्याचे धम्म रक्षण करतो. परित्तसूत्रांचे पठनामागे हेच तत्व आहे, असे निदर्शनास येते. बरे करणे वा रक्षण करणे हे प्रभावी सामर्थ्य सत्यक्रिया वा सत्यावर आधारीत प्रतिज्ञा ह्यात आहे. परित्तपाठाच्या प्रभावी शक्तीवर श्रध्दा ठेवणे हेच कार्य परित्तपाठ करीत असतात.

## सद्‌गुणांचे सामर्थ्य

परित्त ग्रंथातील अनेक सुत्रे सद्‌गुणी जीवनाची वर्णने करतात. बौध्द धम्माची प्रथम पायरी म्हणजे 'शील' (सद्‌गुण) शीलाच्या भक्कम पायावर उभे राहून एखाद्याने समाधी प्राप्त करण्याचा प्रयत्न करावा. सद्‌गुण सद्‌गुण्याचे रक्षण करतो. यास्तव जी व्यक्ती समंजसपणे परित्तसुत्रपठनाचे ध्यानपूर्वक बुध्दधम्मावरील संपूर्ण श्रध्देसह श्रवण करते, त्या व्यक्तीला अशी सद्‌गुणी अवस्था प्राप्त होईल की ज्यायोगे तो दुष्पप्रवृत्तीवर मानसिक प्रभुत्व गाजवू शकेल आणि स्वतःचे सर्व आपत्तीपासून रक्षण करू शकेल.

## मैत्री (प्रीती) भावनेचे सामर्थ्य

करूणामय बुध्दाने म्हटलेले बोल केव्हाही मैत्रीभावनाविरहीत नसतात. आपल्या पंचेचाळीस वर्षाच्या कारकिर्दीत त्यांनी मजल दर मजल करून गावोगावात, समरस्ते, गल्लोगल्ली भटकून आपल्या प्रेमाचा आणि करूणेचा आस्वाद सर्व जनतेला आपला उपदेश व प्रवचने देऊन प्रदान केला व मार्गदर्शनाद्वारे त्यांची मने उल्हसित केली. त्याचप्रमाणे परित्तपठन करणाऱ्याकडून देखील भगवंताच्या त्याच सूत्रांचा परिपाठ प्रेम आणि करूणेने भरलेल्या हृदयाने करीत असताना 'श्रावक आणि इतरांचे भले होवो, ते सुखी होवोत आणि सर्व आपत्तीपासून त्यांचे रक्षण होवो' अशी इच्छा करीत असतात. हे करण्याची अपेक्षा आपण त्यांच्याकडून करतो.

प्रेम-मैत्रीभावना ही एक क्रियाशील शक्ती आहे. जी व्यक्ती खरोखर दुसऱ्यावर प्रेम करते, त्या व्यक्तीची प्रत्येक कृती ही दुसऱ्यांना मदत करणे, प्रेरीत करणे, त्यांचा मार्ग सुकर करून, दुःखावर विजय प्राप्त करण्यासाठी त्याला तयार करणे ही असते. बौध्द धम्मानुसार 'मैत्रीभावना' ही केवळ सुंदर व गोड उक्ती नसून, ती वैरी मनुष्य वा पशु वा भूत-पिशाच्च ह्यांची मानसिक अवस्था दयाशीलपणा, बंधुत्व, प्रेमभावना, मैत्रीभावना ह्याने व्याप्त करणे ही आहे. मानसिक विचार ह्या जणू वस्तू आहेत आणि मानसिक क्रिया-भावनिक वा बौध्दिक - ही अनेक शक्तीमध्ये, परिणामकारक कार्य करण्यास समर्थ अशी व्यक्ती आहे.

## ध्वनीचे सामर्थ्य

खणखणीत आवाजात स्पष्ट रीतीने आणि सुश्राव्यरित्या पाली ग्रंथातील परित्त पठनाद्वारे उत्पन्न झालेला कंपनात्मक ध्वनी हा शरीरातील शिरांना सांत्वनकारक असतो आणि त्यामुळे मानसिक शांती आणि स्थिरता प्राप्त होते. शारीरिक पध्दतीत तो ध्वनी ऐक्य निर्माण करतो.

दुष्ट व्यक्तीपासून निर्माण होणारा वाईट प्रभाव परित्तसूत्र पठनाद्वारे कसा थोपविला जातो

? वाईट प्रभाव हा वाईट विचारांचा परिणाम असतो. यास्तव तो आरोग्यकारक मानसिक अवस्थाद्वारे थोपविला जातो. हितकारक मानसिक अवस्था निर्माण करण्याचा एकमेव खात्रीचा मार्ग म्हणजे परित्तसुत्ताचे ध्यानपूर्वक व श्रध्दापूर्वक पठन-श्रवण करून त्यांचयावर मनन करणे. परित्त पठनातील सत्यावर संपूर्णपणे मनःपूर्वक साधनेच्या सामर्थ्यावर एकाग्रता व श्रध्देद्वारे व्यक्ती आरोग्यकारक मानसिक अवस्था निर्माण करू शकते. ही ऐहिक देणगी परित्तपठनाद्वारे प्राप्त होऊ शकते.

बुध्दधम्मानुसार योग्य प्रयत्नामुळे दुःखावर मात करता येते. परित्तसूत्र पठनाचे योग्य प्रकारे श्रवण केल्यास त्यामुळे अशी एक शक्ती प्राप्त होते की जिच्यामुळे ऐहिक आणि अध्यात्मिक प्रगती साधता येते.

सर्व दुःखाचे आणि विपत्तीचे मूळ कारण म्हणझे मानसकि व शारीरिक आजार, त्याला धम्म पठनापेक्षा अधिक चांगले औषध नाही. यास्तव परित्तसूत्रांत धम्म समाविष्ट असल्यामुळे त्यांचे जेव्हा योग्य प्रकारे आणि योग्य प्रवृत्तीने पठन-श्रवण केले जाते तेव्हा परिणामतः आरोग्यकारक प्रकृती व ऐहिक आणि अध्यात्मिक प्रगती साधता येते.

हे सत्य आहे की बौध्दजन परित्ताला कधीही अपयश न आणणारे जालीम आणि शुध्दीकाकरक शक्ती आणि महान सामर्थ्यवान दायक मानतात. तथापि प्रश्न असा उद्‌भवतो की परित्त ग्रंथातील सूत्रांचे पठन करून त्याचा परिणाम प्रत्येक बाबतीत इच्छिताला रक्षण आणि शुभेच्छा मिळवून देतात का ? ह्या प्रश्नाच्या उत्तरासाठी 'मिलिन्दप्रश्न' ग्रंथात नागसेनाने राजा मिलिन्दाला दिलेल्या उत्तराचा आपल्याला विचार करणे क्रमप्राप्त आहे. राजा मिलिन्दाने पृच्छा केली की 'परित्त पठनाने एखाद्याला मृत्यूपासून रक्षण का मिळत नाही?' त्याचे उत्तर भगवान बुध्दाचे परित्राणाचा उपदेश केला आहे हे खरे आहे, परंतु ज्यांचे आयुष्य अजुन शिल्लक आहे, ज्यांना जगण्यासाठी वेळ प्रतिक्षा करीत आहे आणि जे स्वतःला वाईट कर्मापासून रोखण्याचे सामर्थ्य बाळगतात, त्यांच्यासाठी परित्राणाचा उपदेशआहे. ज्यांचे आयुष्य संपुष्टात आले आहे, त्यांचे आयुष्य वाढविण्यासाठी ही परित्राण मंगल गाथा नाही.

ज्या वृक्षांची मुळे मृतप्राय झालेली आहेत, ज्या वृक्षांची जीवनशक्ती नष्ट झालेली आहे, जो वाळून, कोमेजून गेला आहे आणि फिक्का पडला आहे. त्या वृक्षावर हजारो घागरी पाणी टाकले री तो पल्लवीत आणि रसरसीत होणार नाही. त्याचप्रमाणे आयुष्य संपलेल्या लोकांना औषध किंवा परित्राणाचा मंगलपाठ कधीही वाचवू शकणार नाही. जगात जेवढ्या औषधाच्या जड्याबुट्या आहेत त्या सर्व आयुष्य  संपलेल्या लोकांकरीता व्यर्थ आहेत. ज्यांचे आयुष्य अजून शिल्लक आहे, ज्यांना जगण्यासाठी वेळ प्रतिक्षा करीत आहे आणि ज्याच्यात  स्वतःला वाईट कर्मापासून रोखण्याचे सामर्थ्य आहे, त्यांच्यासाठीच परित्राणाच्या मंगल गाथांचा उपदेश भगवान बुध्दाने केला आहे. कारण त्यांनाच परित्राण लाभदायक ठरणारा आहे.

वैद्य लोक रोग्यांना औषध देतांना, पाजताना किंवा जखमेर लेप लावताना आपण प्रत्यक्ष पाहतो व अशा उपायाने तो रोगी आजारमुक्त झाल्याचेही पाहतो. त्याचप्रमाणे परित्राणाच्या मंगल गाथांचा पाठ चालला असता आपण त्यातील शब्द ऐकत राहतो. सुकून गेलेली जीभ, मंद पडलेले हृदयाचे ठोके, क्षीण झालेला आवाज या सर्व गोष्टी पाहण्यात येतात परंतु परित्राणामुळे त्यांचे निरनिराळे रोग, बिकट प्रसंग किंवा सर्वच प्रकारचे उपद्रव एकदम शांत होतात.

परित्तपठनाने काही परिणाम होत नाही. हे म्हणणे देखील खरे नाही. एखाद्या व्यक्तिसंबंधी परित्राणाच्या मंगल गाथा म्हटल्या असता त्याचा चावा घेण्यासाठी अंगावर धावून आलेला साप देखील उघडलेले तोंड आपोआपच बंद करील व चावू शकणार नाही. चोरांनी मारण्यासाठी उगारलेली काठी अनायासेच खाली पडेल व ते त्याजवर प्रेम करू लागतील. खवळलेला हत्ती सुध्दा जवळ येताच आकस्मिकपणे जागीच थांबेल. उफाळणाऱ्या अग्नीच्या ज्वाला त्याच्याजवळ पोहचण्यापूर्वीच विझून जातील. हाहल विषसुध्दा पोटामध्ये गेले तरी ते निरूपद्रवी ठरून शरीर पोषणाचे काम करील. मारण्याच्या इच्छेने धावून आलेला मारेकरी देखील जवळ येताच सेवकाप्रमाणे नम्र होईल. ही महान शक्ति परित्तपठनात आहे.

जाळ्यात (वा संकटात) सापडला असता देकील एखादा त्यातून सुरक्षित बाहेर पडेल, हे आपल्याला 'मोरपरित्ता' च्या कथेद्वारे कळून येते. एका पारध्याने अनेक वर्षेपर्यंत एका मोरास आपल्या जाळ्यात पकडण्यासाठी अविरत प्रयत्न केले. परंतु तो मोर परित्राणाच्या मंगलमय गाथांचे स्मरण करीत असल्यामुळे त्यास तो पारधी आपल्या जाळ्यात पकडू शकला नाही. पण ज्या दिवशी त्या मोराने परित्राणाचे स्मरण करणे सोडून दिले (परित्तपठन करण्यास विसरला) त्याच दिवशी तो जाळ्यात अडकून पडला. यावरून हेच सिध्द होते की परित्राणात महान शक्ती आहे. 'मिलिन्दप्रश्न' ह्या ग्रंथातील वरील स्पष्टीकरणामुळे आपल्याला परित्ताची उपयुक्तता, महती व सामर्थ्य कळून येते.

थोडक्यात, परित्ताने सर्वांचे रक्षण होत नाही. तर काहींचे होते आणि काहींचे नाही. तीन कारणानी परित्त रक्षणकार्यात सफल होऊ शकत नाही. १) एखाद्या कर्मफळाची मध्येच बाधा पडल्यामुळे (कम्मावरण) २) वाईट (पाप) कर्माचे विघ्नबाधक झाल्यामुळे (किलेसावरण) आणि ३) परित्राणाच्या मंगलमय गाथांवर विश्वास नसल्यामुळे (अस्सद्दहनता),परित्राणाच्या मंगलमय पाठात रक्षण करण्याचे बळ असून देखील ते व्यर्थ जाण्यास लोकांचे म्हणजे त्यांचे स्वतःचेच कर्म तेथे आड येते, त्यांच्याच कर्माचा हा परिणाम आहे.

कर्म म्हणजे कार्य.पण कार्याचा परिणाम नव्हे. यास्तव, एक कर्ण दुसऱ्या कर्माने थोपवून ठेवता येते. कर्म स्थिर नसून ते सतत बदलत असते, म्हणून एक कर्म दुसऱ्या कर्माने थोपवून धरता येते. परिणामतः ऐकणाऱ्या वाईट कर्मामुळे परित्तपठनाचे हितकारक परिणाम नाहीसे होतात.

तसेच जर श्रोत्याचे मन अशुध्द विचाराने प्रदुषित असेल, तरीसुध्दा परित्तपठनाने इच्छित परिणाम सफल होत नाहीत. परंतु श्रोत्याचे मन कितीही प्रदूषित व अशुध्द असेल, परंतु श्रोत्याची परित्तपठनावर महान श्रध्दा असेल तर ह्या महत्वाच्या घटकामुळे त्या श्रोत्याला पठनाचे हितकारक परिणाम प्राप्त होऊ शकतात.

परित्तसूत्रांचे निरूपण (आख्यान) हे कथनकाराला तसेच श्रोत्यांना, जर त्यांनी हे आख्यान भक्तिपूर्ण आणि भगवान बुध्दाच्या धम्मावर श्रध्दा ठेवून केले तर त्याच्यात मानसिक आरोग्यकारक अवस्था निर्माण करते. ही मानकि आरोग्यावस्था आजाऱ्याला सर्वसामान्य आरोग्य मिळवून देते आणि दुःख वा नैराश्यासारख्या भावनांवर विजय प्राप्त करण्यास मदत करते.

# परित्ताच्या आवृत्तीची गरज

परित्तग्रंथ बुध्दाच्या धम्म शिकवणीतील घेतलेले अनेक प्रवचने वा सूत्रांचा समावेश आहे. ह्या ग्रंथाचे पठन बौध्द मंदिरे वा बौध्द उपासकाच्या निवासस्थानी सर्व विपत्तीपासून रक्षण करण्यासाठी पठन करायचे असते. हे सर्व पठन बुध्द, धम्म, संघ ह्यांच्या गुणांचा श्रध्दापुर्वक पुनरूच्चार आणि स्मरण करून करायचे असते. जगातील निरनिराळ्या बौध्द देशांतील बौध्द लोक आपल्या खाजगी व सामाजिक जीवनातील समारंभात परित्तसंगायन हा एक वैशिष्ट्यपुर्ण व अर्थपूर्ण असा समारंभ आहे. श्रीलंकेत परित्त समारंभात अतिशय अर्थपूर्ण असून कोणातही समारंभ-धार्मिक वा सामाजिक परित्त संगायनाशिवाय पूर्ण होत नाही. मात्र भारतात आणि विशेपतः महाराष्ट्रात ही पध्दती अद्यापही रूजू झाली नाही. महाराष्ट्रातील बौध्द अनुयायांनी 'परित्त पठन' ही दैनंदिन कार्यक्रम आखावा यास्तव, ह्या ग्रंथाची रचना केलेली आहे.

ज्यावेळी बौध्द भिक्षू उपलब्ध नसतील, त्यावेळी कोणीही सद्‌गुणी, आचरणशील व श्रध्दावान उपासक ह्या ग्रंथाचे पठन करू शकतो. पुष्कळ उपासक हे परित्त सूत्रपाठ फक्त पालीभाषेत श्रवण करतात, परंतु त्यांना त्याचा अर्थ क्वचितच कळतो आमि त्यामुळे त्यांना पुरेसा हितवर्धक लाभ प्राप्त होत नाही. ह्या मराठी अनुवादामुळे ज्यावेळी 'महापिरित-पोत-परित्त' रक्षणपाठांचे पालीतून पठन केला जाईल, तेऱ्हा प्रत्येक उपासकाला ह्या ग्रंथाच्या आधारे समंजसपणे परित्तपठन-श्रवण करता येईल आणि भरपूर लाभ घेता येईल. प्रत्येक बौध्दांच्या घरी हा परित्तग्रंथ उपलब्ध असावा आणि त्यांचे श्रध्दापूर्वक आणि भक्तीभावाने पठन-श्रवण केले जावे म्हणून मराठी भाषिक बौध्दजनांसाठी ही आवृत्ती तयार केलेली आहे.

# पारत्तपाठांचा संक्षिप्त सारांश

**पारत्तपाठांचा संक्षिप्त सारांश**

संपूर्ण परिचय चार विभागात विभागला असून प्रत्येक विभागाला भाणवार असे म्हणतात. प्रथम भाणवार धजग्गपरित्ताच्या शेवटी, दुसरा भाणवार इसिगिलीसूत्तच्या शेवटी, तृतीय भाणवार आटानाटिय सुत्राच्या प्रथमार्धात, तर चतुर्थ भाणवार आटानाटिय सुत्राच्या उत्तरार्धात संपतो.

संपूर्ण परित्तग्रंथ चतुभाणवार पालि सुत्तपिटकातील खालीलप्रमाणे सुत्रे घेऊन तयार केलेला आहे.

| परित्ततील सुत्रे | कोणत्या निकायातून घेतली आहेत |
|---|---|
| १) सरणागमन | खुद्दकनिकाय - खउद्दकपाठ |
| २) दससिक्खापद | खुद्दकनिकाय - खउद्दकपाठ |
| ३) सामणेरपञ्ह | खुद्दकनिकाय - खउद्दकपाठ |
| ४) व्दतिंसाकार | खुद्दकनिकाय - खउद्दकपाठ |
| ५) पच्चवेक्खणा | अंगुत्तरनिकाय |
| ६) दसधम्मसुत्तं | अंगुत्तरनिकाय |
| ७) महामंगलसुतं | खुद्दकनिकाय - खउद्दकपाठ |
| ८) रतनसुतं | खुद्दकनिकाय - खउद्दकपाठ |
| ९) करणीयमेत्तसुतं | खुद्दकनिकाय - खउद्दकपाठ |
| १०) खन्धपरितं | अंगुत्तरनिकाय |
| ११) मेत्तानिसंससुत्तं | अंगुत्तरनिकाय |
| १२) मित्तानिसंसं | खुद्दकनिकाय |
| १३) मोरपरित्तं | खुद्दकनिकाय |
| १४) चन्दपरित्तं | संयुत्तनिकाय |
| १५) सुरियपरित्तं | संयुत्तनिकाय |
| १६) धजग्गपरित्तं | संयुत्तनिकाय |
| १७) महाकस्सपत्थेरबोज्झंगं | संयुत्तनिकाय |
| १८) महामोग्गलनत्थेरबोज्झंग | संयुत्तनिकाय |
| १९) महाचुन्दत्थेरबोज्झंगं | संयुत्तनिकाय |
| २०) गिरिमानन्दसुत्तं | गुत्तरनिकाय |
| २१) इसिगिलीसुत्तं | मज्जिमनिकाय |
| २२) धम्मचक्कपवत्तनसुत्तं | संयुत्तनिकाय |
| २३) महासमयसुत्तं | दीघनिकाय |
| २४)आळवसुत्तं | खुद्दकनिकाय |
| २५) कसीभारव्दाजसुत्तं | संयुत्तनिकाय- खुद्दकनिकाय |
| २६) पराभवसुत्तं | खुद्दकनिकाय- सुत्तनिपात |
| २७) वसलसुत्तं | खुद्दकनिकाय- सुत्तनिपात |
| २८) सच्चविभंगसुत्तं | मज्झिमनिकाय |
| २९) आटानाटिसुत्तं | दीघनिकाय |

संक्षिप्तपणे, परित्तसुत्राचे पठन (सर्व) विपत्तीचे निर्मुलन करण्यासाठी (विपत्तिपटिबाहाय), सर्व प्रकारच्या संपत्तीचे संपादन करण्यासाठी (सब्बसम्पत्तिसिध्दिया), सर्व प्रकारच्या दु:खांचा नाश करण्यासाठी, (सब्बदुक्खविनासाय), सर्र प्रकाराच्या भयांचा उच्छेद करण्यासाठी (सब्बभयविनासाय) आणि सर्व प्रकाराच्या रोगांचा परिहार ( विनाश) करण्यासाठी (सब्बरोगविनासाय) केले जाते. परित्तसुत्रांचे पठन बौध्द धर्माचे उपासक शुभतेच्या लाभासाठी व अशुभतेच्या विनाशासाठी करतात. आपणांस मनोबल प्राप्त व्हावे, आपला आत्मविश्वास जागृत व्हावा, आपल्या सुरक्षिततेची निश्चिती वाढावी, आपले मानसिक व शाररिक आरोग्य चांगले रहावे, भूतप्रेत, रोगराई, दुर्भिक्ष व दुष्काळासारखी संकटे नष्ट व्हावीत, आपली धम्मावरील व नितीवरील श्रध्दा चांगली सुदृढ रहावी व अशा रितीने आपले परित्राण (सुरक्षा) व्हावे अशा हेतूंनी या लहान लहान व त्यासाठी नमस्कार किंवा भगवान बुध्दाला वन्दना ही केवळ परित्ताच्या आरंभीच नव्हे, तर सर्व बौध्द समारंभाच्या आरंभी तीनदा म्टहटली जाते.परित्त ग्रथांची सुरवात 'सरणागमनं' ह्या सुत्रापासून होते.

### १.सरणागमनं - शरण जाणे

भगवान बुध्द, त्याने उपदेशिलेला धर्म व त्या धर्माप्रमाणे आदेश असे वर्तन करून त्याचा उपदेश करणाऱ्या भिक्षुसंघाला बौध्द भिक्षु व उपासक पुन: पुन्हा शरण येतात. त्याला 'सरणागमनं' म्हणतात. हा प्रकार बौध्द जीवनमार्गाचा एक अविभाज्य भाग असून बुध्द , धम्म व संघ ह्या तीन रत्नाच्या सामर्थ्याने त्याचे कथन करणाऱ्याला रक्षण प्राप्त करून देते अशी श्रध्दा आहे.

### २. दससिक्खापदानि - दहा शिक्षापदे

प्राणीहिंसा, चोरी, व्याभिचार, असत्यवचन व सुरा, दारू व मद्यासारख्या दुराचाराला प्रोत्साहन देणाऱ्या वस्तूपासून दूर रहाणे, अवेळी जेवणे, नृत्य, गीत, गायनवादन व इतर मनोरंजनाच्या समारंभापासून दूर रहाणे, माला, सुगंध, विलेपन धारण करून स्वत:ला विभूषित करणे, उंचउंच व वैभवी आसन व शयनांचा (उपभोग) करणे आणि सोने व चांदी यांचा स्वीकार करणे या दहा प्रकारच्या वस्तूपासून दूर राहण्याच्या सर्व प्रतिज्ञाचा स्वीकार बौध्द भिक्षू वा संघात प्रवेश करणारे श्रामणेर (प्रशिक्षणार्थी भिक्षू) स्विकारतात. त्यापैकी पहिल्या पाच प्रतिज्ञाचा स्वीकार बौध्द उपासक करतात. ते प्राणीहिंसा, चोरी, असत्यवचन, व्याभिचार आणि मद्यपान न स्वीकरण्याचे व्रत आजीवन स्वीकारतात.

### ३. सामणेरपञ्हा - श्रामणेर पश्न

सर्व प्राणिमात्रांच्या जीवनाचा आधार आहारावर अवलंबित असतो. नाम व रूप, तीन प्रकारच्या वेदना, चार आर्यसत्ये, पाच उपादानस्कंध, सहा इंन्द्रिये व त्यांचे सहा विषय, सात बोध्यंगे, आर्य अष्टांगिक मार्ग, प्राण्याचे नऊ आवास व दहा गुणांनी युक्त असा अर्हन्त, बौध्द श्रामणेराला या गोष्टींचे ज्ञान दिले जाते. बौध्दधर्माच्या काही अधिक महत्वाच्या मुलभूत शिकवणुकीची तत्वे ह्यांत समाविष्ट आहेत.

### ४. व्दतिंसाकार - शरिराचे बत्तीस विभाग

या शरिराचे विविध प्रकारचे असे बत्तीस विभाग आहेत. एवंगुणविशिष्ट शरिरावर फार प्रेम, उन्माद, आसक्ति व लोभ साधकाने ठेवू नये.

### ५. पच्चवेक्खणा - विचारपूर्वक मनन

भिक्षूंनी थंडी व उन्हाळा यांचा सामना करण्यासाठी डांस व चिलटे, ऊनवारा आणि

सरपटणाऱ्या प्राण्यांपासून आपले रक्षण करण्यासाठी, तसेच जनलज्जा व मनलज्जा झाकण्यासाठी (निवारण करण्यासाठी) भिक्षुवस्त्रे धारण करावयाची असतात.

भिक्षुंनी आपल्या हातातील भिक्षापात्र अभिमानाने किंवा शोभेसाठी किंवा अलंकार म्हणून धारपण करावयाचे नसते. पण हिंसेपासून दूर राहण्यासाठी, ब्रम्हचार्याचे पालन करण्यासाठी व निरपवाद असे संन्याशाचे जीवन व्यवस्थितपणे जगण्यासाठीभिक्षापात्र ग्रहण करावयाचे असते.

भिक्षुंनी आपल्या निवासस्थानाचा उपभोग एकान्तवासात शांतपणे जगण्यासाठी करावयाचा असतो.

त्याचप्रमाणे भिक्षुंनी व्याधिग्रस्तांसाठी उपयोगात आणण्याच्या औषधांचा उपयोग विचारपूर्वक करावयाचा असतो. थोडक्यात ,प्रत्येक जरूरीच्या गोष्टीला भिक्षुंच्या जीवनात काही विशिष्ट कार्यभाग साधायचा असतो. हे सुत्रात कथन केलेले आहे.

### ६.दसधम्मसुत्तं - (भिक्षूचे) दहा विचारकरण्याजोगे धर्म

खालील दहा गोष्टींविषयी प्रव्रजितांनी नेहमी सारासार आणि जागरूकतेने विचार केला पाहिजे.

माझे (प्रव्रजिताचे - भिक्षुंचे )जीवन माझ्या पूर्वीच्या जीवमनापेक्षा आता फार निराळे आहे, ते परावलंबी आहे, आता मला दुसऱ्या कोणत्याही प्रकारे जीवनक्रम चालविता येणार नाही. माझ्या व्रतपालनासंबंधी मला अतिशय काळजी ठेवायला हवी. माझे सहधर्मचारी भिक्षुंनी माझ्या व्रतपालनासंबंधी माझ्यावर दोषारोपण करावे, असे माझे वर्तन असता कामा नये. माझ्यासारख्या प्रव्रजिताने, मला सर्व प्रिय वस्तूंपासून अगदी दूर रहायला पाहिजे अशी मनात पक्की गाठ बांधून ठेवायला पाहिजे. माझ्या कर्माचे फळ (कर्माचा वारसा) मला नक्कीच मिळणार आहे. माझा सबंध दिवस व सबंध रात्र कशा रितीने जातात ? एकान्तवासामध्ये माझे मन रमते की नाही ? काही काळानंतर अतिमानवी (विशेष) शक्ती आणि आर्यांच्या (बौध्दांच्या) धर्माचे व तत्वज्ञानाचे पुरेसे ज्ञान प्राप्त झाले आहे का ? तर त्यांच्या प्रश्नाला होकारार्थी उत्तर देण्याला मला काहीही संकोच वाटता कामा नये. अशा प्रकारे भिक्षुंनी (प्रव्रजितांनी) नेहमी विचार केला पाहिजे.

### ७. महामंगलसुत्तं - मंगलसुत्र- (अडतीस) श्रेष्ठ मंगले

भगवान बुध्दाने सर्व पापांचा विनाश करणाऱ्या अडतीस मंगल गुणांविषयी उपदेश केला आहे की जेणेकरून सर्व जगाचे मंगल व्हावे - मुर्खांचा सहवास न करता, त्याचा सन्मान न करता, पूजनीय अशा पंडितांचा आदर करावा, त्यामुळे सर्व काही मंगलमय होते. अनुकूल प्रदेशात राहणे, पुण्यसंचय केलेला असणे, सदचारी असणे, बहुश्रुतता, कलांचे ज्ञान, शिस्तबध्दता, सुभाषित वाणी, आईबापांची सेवा, कुटुंबाचे संगोपन, निर्मल व्यवहार, दान देणे, धर्माचार करणे, नातलगांशी चांगले संबंध ठेवणे,निर्दोष कर्मे करणे, पापांपासून दूर राहणे, मद्यपान करणे, कृतज्ञता बाळगणे, धर्मजिज्ञासा ठेवणे, श्रमणांचे गौरवपूर्ण दर्शन करणे, सहनशीलता ,चांगली वाणी, तप, ब्रम्हचर्य, आर्यसत्यांचे ज्ञान, निर्वाणाचा साक्षात्कार करणे, जगातील बऱ्यावाईट अनुभवांमुळे आपले मन विचलित न होऊ देणे, नि:शोक ,निष्पाप व क्षेमकुशल राहणाऱ्यांना सर्व ठिकाणी सर्वश्रेष्ठ अशी शुभता व सुरक्षितता प्राप्त होते.

### ८.रतनसुत्तं - रत्नसुत्र

भगवान बुध्दाने रतनसुत्ताचा उपदेश करून जगांमधील असंख्य देव व मानवाच्या रोगराई, भूतपप्रत व दुर्मिक्षासारख्या संकटाचे परिमार्जन केले आणि त्यांना संकटमुक्त केले कारण की बुध्द, धर्म आणि संघासारखे एकही रत्न असे नाही की ज्यामुळे संपूर्ण सुरक्षितता,

निर्भयता व संकटमुक्ती प्राप्त होते. भगवान बुध्दाने उपदेशिलेल्या अनासक्तीचा व समाधीचा मार्ग एक सर्वश्रेष्ठ रत्न आहे व त्यामुळे सुरक्षा प्राप्त होते. भगवान बुध्दाच्या धर्माचा उपदेश करणारे भिक्षु दक्षिणा (दान) देण्यास सुयोग्य आहे. त्यांना दिलेली दाने महाफलदायी ठरतात. त्यांनी उपदेशिलेली चार आर्यसत्ये सुरक्षा करणारे मोठे आधारस्तंभ आहेत. त्यांच्या उपदेशाचे पालन करून सदाचार करणाऱ्या माणसाची कधीच अवनती होत नाही. अशा प्रकारे बुध्द, धर्म आणि भिक्षुसंघ सर्वश्रेष्ठ रत्नासारखी मुल्यवान आहेत म्हणून त्यांना नेहमी आदरपूर्वक वन्दन करून सर्वश्रेष्ठ सुरक्षा प्राप्त करावी.

## ९. करणीयमेत्तसुत्तं - कर्तव्यदर्शक मैत्रीभावनेचा सराव

सार्वत्रीक मैत्रीभाव (सौजन्यता) मनात धारण करणारा व रात्रंदिवस त्याविषयी दक्षता बाळगणारा मनुष्य निश्चितपणे झोपतो व त्याच्या हातून काहीही पाप घडत नाही. संतोषी व साधे जीवन जगणारा मनुष्य त्याच्या मैत्रीभावनेमुळे शांत व सरळ जीवन जगतो. तो कोणतेही निंदनीय कर्म करीत नाही व सर्व प्राणिमात्रांच्या हिताची व सुखाची उच्छा करतो. कोणीही कोणाची फसवणूक करू नये, कोणाचा अपमान करून नये, कोणावर रागवू नये व कोणाच्या दु:खाची इच्छा करकू नये. आई ज्याप्रमाणे आपल्या एकुलत्या एक पुत्राची जोपासना करते, त्याप्रमाणे माणसाने आपल्या मनात सर्व प्राणिमात्रांसाठी प्रेमभाव ठेवावा आणि सर्वव्यापी व सर्वकालीन बुन्धुभाव आपल्या मनात राखावा. माणसाने कोणत्याही प्रकारची मिथ्या दृष्टी मनात ठेऊ नये. चरित्र्यसंपन्न असावे, कामसुखाची उच्छा दाबून टाकावी, अशा प्रकारे पुर्नजन्माचा त्याग करावा.

## १०. खन्धपरित्तं - स्कंद परित्राण

एकदा कोणी एक भिक्षू श्रावस्तीनगरीत सर्पदंशाने मरण पावला असता भगवान बुध्दाने त्याच्या मृत्यूचे कारण असे सांगितले की त्या भिक्षुने आपल्या मनता सर्पाच्या सर्व जातीविषयी मैत्रीभाव जोपासला नसल्याने त्या भिक्षुला तसे मरण प्राप्त झाले होते.भिक्षूंनी सर्वांच्या बाबतीत मैत्रीभाव बाळगावा हा उपदेश.

## ११. मेत्तानिसंसुत्तं - मैत्रीभावनेचे लाभ

माणूस सार्वत्रिक व सर्वकालीन मैत्रीभावना आपल्या मनात जोपासून वृध्दिंगत व दृढमूल करून अकरा लाभाची अपेक्षा करू शकतो. उदा. सुखनिद्रा, शर्व प्राणिमात्रांत प्रियता, देवादिकांचे रक्षाकवच, अग्नि, विषबाधा किंवा शस्त्रापासून संरक्षण (निर्बंधता) त्वरीत ध्यान प्राप्ती, प्रसन्न मुखमुद्रा, जागृतावस्थेमध्ये मरण, ब्रम्हलोकामध्ये पुर्नजन्म, इत्यादी.

## १२. मत्तानिसंस - मैत्रीचे फायदे

आपल्या मित्रांचा (बांधवाचा) द्रोह न करता जोत्याच्याशी प्रेमयुक्त दयेने वागतो, त्याला त्याच्या अभिन्न मैत्रीमुळे अनेक फायदे होतात. त्याला सर्व ठिकाणी आदर प्रप्त होतो. त्याचा आदरसत्कार होतो, त्याला यश व कीर्ती प्राप्त होतात.व त्याला सुखसमृध्दी प्राप्त होते. त्याने अंगीकारलेल्या मैत्रीव्रतामुळे त्याचे आकस्मिक अपघातांपासून व शत्रूपासून रक्षण होते.

## १३. मोरपरित्तं - मोरपरित्राण

भगवान बुध्दाच्या गुणांची स्तुती करून , त्याचे स्मरण करून संकटातून मुक्त होण्यासाठी मोरयोनीत जन्मलेल्या बोधिसत्वाने प्रार्थना केल्यानंतर वनचर शिकाऱ्यांच्या त्रासापासून त्याची सुटका झाली.

## १४. चन्दपरित्तं - चंद्र परित्राण

एकदा राहूच्या जबड्यात सापडलेल्या चन्द्राने भगावान बुध्दाचे स्मरण करून राहूच्या पकडीतून सुटण्यासाठी तथागत बुध्दाला चन्द्र शरण गेल्यावर व संकटमुक्त होण्यासाठी त्याची स्तुती करून, प्रार्थना केल्यावर चन्द्राची राहूच्या पकडीतून (ग्रहणातून) सुटका झाली.

### १५. सुरियपरित्त - सुर्य परित्राण

असुरांचा राजा राहू, सुर्याला गिळंकृत करतो. सुर्य बुध्दाची मदत मागतो व बुध्दाला शरण जातो. यास्तव बुध्द राहूला सूर्याला मुक्त करण्यास सांगतो. राहू त्याला लगेच मुक्त करतो.

### १६. धजग्गपरित्तं - ध्वजाग्र परित्राण

सुर (देव) आणि असुर (राक्षस) ह्यांच्यात झालेल्या लढाईचा संदर्भ ह्या सुत्रात आहे. सुरांनी आपल्या निरनिराळ्या देवांच्या ध्वजाकडे रक्षणार्थ लक्ष लावले. परंतू बुध्दाने त्यांना सांगितले की बुध्द, धम्म व संघ श्रेष्ठतर आहेत आणि रक्षणार्थ त्यांनाच शरण जावे. ह्या सुत्राव्दारे देवांच्या शक्तीवरील श्रध्दा निदर्शनास येते. मात्र ह्यापेक्षाही बुध्द, धम्म व संघ हे अधिकतम श्रेष्ठ शरण आहेत असे प्रतिचपादन केले आहे.

### १७. महाकस्सपबोज्झंगसुत्तं - महाकश्यपबोध्यंग सुत्र (परित्राण)

### १८. महामोग्गलानत्थेरबोज्झंगसुत्तं- महामोग्गलानबोध्यंग सुत्र (परित्राण)

ह्या दोन्ही सुत्रांचा विषय एकच आहे प्रत्येक सुत्रांत ,स्थाविर महाकस्सप आणि स्थविर मोग्गलान आजारी असतात. बुध्द दोघांच्या प्रकृतीची चौकशी करतात आणि त्यांना सात बोज्झंग (ज्ञानाचे सात घटक) ह्याविषयी बोलतात. त्यांचा सराव केल्यास व्यक्तीला निर्वाणप्राप्त होते.बोध्यंगावरील प्रवचन ऐकून दोघांचा आजार बरा झाला.

### १९. महाचुन्दत्थेर बोज्झंग- महाचुन्दत्थेरबोध्यंग सुत्र (परित्राण)

ह्या सुत्रात बुध्द आजारी होते असे सांगण्यात आले असून, स्थविर चुन्द भगवंताच्या प्रकृतीची चौकशी करतात. भगवान आजारी असल्यामुळे, स्थविर चुन्द भगवंतांनी शिकविलेल्या सात बोध्यंगाचे पठन भगवंतापाशी बसून करतात व भगवान आजारातून बरे होतात. धम्मामुळे सर्व आजाजर बरे होतात. कदाचित बोध्यंगीवर केलेली ध्यान साधना किंवा बोध्यंगाच्या सामर्थ्यामुळे निर्वाण प्राप्त केलेले वरील दोन स्थविर आणि भगवान बुध्द स्वतः आजारातून बरे झाले. म्हणून ह्या तीन बोध्यंगपरित्राणाच्या संगायन करण्याला रक्षणगीतांचे महत्व प्राप्त झाले आहे.

### २० गिरिमानन्दसुत्तं - गिरिमानन्द सुत्र (परित्राण)

ह्या सुत्रात असे कथन केले आहे की स्थविर गिरिमानन्द आजारी असतात. भगवांताच्या सूचनेनुसार त्याने जर दहा संज्ञांचे श्रवण केले तर ते आपल्या आजारातून बरे होतील, स्थावर आनंद भगवंताकडून त्या दहा सज्ञां शिकतात आणि स्थविर गिरिमानन्दासमोर जाऊन त्यांचे पठन संगायन करतात .स्थविर गिरिमानन्द आपल्या आजारातून बरे होतात. म्हणून दहा संज्ञाचे वर्णन आणि तपशीलवार मोजदाद रक्षण म्हणून मानले जाते.

### २१ इसिगिलीसुत्तं - इसिगिली सुत्र (परित्राण)

ह्या सुत्रात इसिगिली पर्वतावर राहणाऱ्या प्रत्येकबुध्दाचे वर्णन दिले आहे. ते बुध्द दीर्घकालापासून तेथे राहत होते. भगवंतांनी इसिगिली पर्वतावर राहणाऱ्या सर्व प्रत्येक बुध्दाची यादी दिलेली आहे आणि त्यांनी निर्वाण प्राप्त झाल्यामुळे , त्याची उपासना करावी असे सूचित केले आहे. प्रत्येकबुध्द म्हणजे ज्याला बोधिज्ञान प्राप्त झालेले असते, परंतू तो लोकात जाऊन लोकांना आपल्या ज्ञानाचा उपदेश करीत नाही. त्याला प्रत्येकबुध्द म्हणतात.

### २२. धम्मचक्कपवत्तनसुत्तं - धम्मचक्रप्रवर्तन सुत्र

हे प्रवचन भगवान बुध्दाने वारणसीत इसिपतन येथील मृगदायात दिलेले असून तो बौध्दधम्माचा येथे पाचशे अरहन्तासमवेत रहात असतांना दहा चक्रवाळांतून देव भगवंताकडे येतात . चार ब्रम्हदेव सुध्दा येऊन भगवान बुध्दाशी गाथाव्दारे संभाषण करतात, त्यानंतर बुध्द सर्व प्रकारच्या देवदेवतांविषयी बोलतात आणि भिक्षुगण त्यासर्व देवांना आपल्या सिध्दीच्या समार्थ्याने पाहतात. हे सर्व देव भगवान बुध्दाला शरण येतात.

## २३ महासमयसुत्तं - महासमय सुत्र

हे सूत्र महायानपंथ वा आणखी कोणत्या तरी पंथाने मागाहून घुसवलेले आहे. भगवान कपिलवस्तू येथे पाचशे अरहन्तासमवेत रहात असताना दहा चक्रवादळातून देव भगवंताकडे येतात. चार ब्रह्मदेव सुध्दा येऊन भगवान बुध्दाशी गाथाद्वारे संभाषण करतात. त्यानंतर बुध्द सर्व प्रकारच्या देवदेवतांविषयी बोलतात आणि भिक्षुगण त्या सर्व देवांना आपल्या सिध्दीच्या सामर्थ्याने पाहतात. हे सर्व देव भगवान बुध्दाला शरण येतात.

## २४ आळवकसुत्तं - आळवक सुत्र

भगवान बुध्द आळवीनगरात आळवक यक्षाला त्याच्या घरी जाऊन भेटतात. आळवक भगवन्ताला तीनदा बाहेर जाण्यास व आत येण्यास सांगतो. भगवान बुध्द त्याच्या आज्ञेचे पालन करतात. मात्र चौथ्यांदा भरवान त्याची आज्ञा पाळत नाहीत. तेव्हा आळवयक्ष बुध्दाला काही प्रश्न विचारतो आणि भगवान बुध्द त्या प्रश्नांची योग्य उत्तरे देतात. शेवटी आळवकयक्ष बुध्दाला शरण जातो.

## २५. कृषिभारव्दाजसुत्तं - कृषिभारव्दाज सुत्र

भगवान बुध्द कृषिभारव्दाज ब्राम्हणाकडे त्याच्या कामाच्या ठिकाणी जातात. ब्राम्हण त्यांना सांगतो की माझ्याप्रमाणे तू नांगरीत नाहीस व पेरीत नाहीस . त्यावर भगवान बुध्द त्याला योग्य उपमा वापरून उत्तर देतो. ब्रम्हणाला भगवंताच्या कार्याची माहिती कळते. नंतर कृषिभारव्दाज ब्राम्हण बुध्द, धम्म आणि संघाला शरण येतो.

## २६. पराभवसुत्तं - पराभव सुत्र

ह्या सुत्रात भगवंतानेउपदेश केलेला आहे. एक देवता भगवन्ताला मनुष्याची हानि कशी होते व त्याची कारणे काय , असे विचारले असता, भगवान बुध्द पराभवाची योग्य कारणे सांगतात.

## २७. वसलसुत्तं (अग्गिकभारव्दाज सुत्तं)वृषल सुत्र (अग्निकभारव्दाज सुत्र)

भगवान बुध्द भिक्षाटन करीत असतांना अग्गिकभारव्दाज ब्राम्हणाच्या घरी आल्यावर ब्राण्हण त्याला वसल (वृपल) असे म्हणतो. भगवान त्याला वसल (चांडाळ) ह्याचा अर्थ विचारतो .पण त्याला तो सांगता येत नाही. तेव्हा भगवान गाथाव्दारे वसल (वृषल) कोणास म्हणावे हे स्पष्ट करून शेवटी जन्मापेक्षा कर्म श्रेष्ठ आहे. हे प्रतिपादन करतात. शेवटी अग्गिकभारव्दाज ब्राम्हण बुध्द, धम्म आणि संघाला शरण येतो.

## २८. सच्चविभंगसुत्तं - सत्यविभंग सुत्र

ह्या सुत्रात चार आर्यसत्याचे तपशिलवार वर्णन केलेल आहे. भिक्षूंना चार आर्य सत्यांचे स्पष्टीकरण करण्यास भगवान बुध्द सारिपुत्ताला सांगतात आणि ते तसे करतात धम्मचक्रप्रवर्तनससुत्रात भगवंतानी दिलेल्या उपदेशाची सारिपुत्त पुनरावृत्ती करतात.

## २९. आटानाटियसुत्तं - आटानाटिय सुत्र

सर्व देव, चार महाराजे, चार दिशांचे रक्षण देव, गंधर्वाचा स्वामी- धतरट्ठ, कुभंडाचा स्वामी विरूळह, नागांचा स्वामी - विरूपक्ख आणि यक्षांचा स्वामी - वेस्सवण हे सर्व गिज्झकूट पर्वतावर भगवान बुध्दाकाडे येतात. वेस्सवण सर्व देवांच्या सभेत भगवंताला आटानाटिय रक्षा शिकवितो आणि निघून जातो.

तदनंतर भगवान सर्व वृत्तांत भिक्षूंना सांगतात आणि त्यांना आटानाटिय रक्षा शिकण्यास विनंती करतात. हे रक्षासुत्र वेस्सवणाच्या एका आटानाट नगरात रचले गेगे, यास्तव त्याला आटानाटियरक्षा असे नाव दिलेले आहे. मूळ परित्तग्रथांत समाविष्ट न केलेली खालील दोन सूत्रे - जिनपञ्जर आणि अंगुलिमालसुत्त ह्या ग्रथांत दिलेली आहेत.

# श्रीलंकेतील सार्वजनिक परित्तसंगायनची पध्दती (संक्षिप्तपणे)

(परित्त-पठन-संगायन समारंभाच्या वेळी काय बोलले जाते हे खाली संक्षिप्तपणे सांगितले आहे. मात्र विधी - उदा. परित्त दोऱ्याची अवस्था, पवित्र जल पात्राची ठेवणे, इत्यादींचा तपशील येथे दिलेला नाही. कारण तो प्रस्तावनेत दिला आहे.)

भिक्षुसंघाचा गट परित्त समारंभासाठी उभारलेल्या दालनात (परित्त मंडपात) प्रवेश करतो आणि आपल्या आसनावर स्थानापन्न होतो. तदनंतर खालील पध्दतीचे पालन केले जाते. (सविस्तर तपशील नंतर दिला आहे).

१. **आराधना - एक उपासक भिक्षूंना सुपारीची पेंढी अर्पण करतो आणि त्यांना परित्ताचे संगायन करण्यास निमंत्रित करतो.**

२. **अनुसासना - ज्येष्ठ भिक्षु श्रोत्यांना त्यांच्या भाषेत उपदेशात्मक भाषण देतो.**

३. **नमस्कार, सरणागमनं पंचशील आणि ही ज्येष्ठ भिक्षूद्वारे उपासकांना त्यांच्या समवेत म्हणण्यास सांगितले जाते.**

४. **देवाराधना - ज्येष्ठ भिक्षुद्वारा देवांची आराधना केली जाते.**

५. **एका भिक्षूद्वारे परित्त श्रवण करण्याची वेळ जाहीर केली जाते.**

६. **नमस्कार**

७. **इतिपि सो भगवा अरहं -**

८. **स्वाक्खातो भगवता धम्मो -**

९. **सुपटिपन्नो भगवतो सावकसंघो**

१०. **आशिर्वाद (एतेन सच्चवज्जेन इ. तीन वेळा)**

११. **बुध्दाचे प्रथम शब्द (अनेकजाति संसारं ....)**

१२. **पटिच्चसमुप्पाद ( प्रतीत्यसमुत्पाद-कार्यकारण संबंध)**

१३. **जगमंगलगाथा**

१४. **कृपाछत्र (आश्रया) साठी सदिच्छा (भवतु सब्बमंगलं इ. तीन वेळा)**

१५. **अ) वाईटापासून रक्षणार्थ विनंति (नक्खत्त- यक्ख-भूतानं इ. तीनदा)**
**ब) रक्षण ठरविणे (रक्षणार्थी ठरविणे) - (सब्बे बुध्दा बलप्पत्ता)**

१६. **तीन सूत्रांचे संगायन (निरूपण)**
**१) महामंगलसुत्त २) रतन सुत्त ३) करणीयमेत्तसुत्त**
**(प्रत्येक सूत्राच्या अंती-एतेन सच्चवज्जेन इ. तीनदा म्हणावे.)**

१७. **महाजयमंगलगाथा - (मराकारूणिको नाथो हिताय इ.)**

ह्यानंतर भिक्षुसंघाचा गट दोन भिक्षूंना मागे ठेवून दालनातून बाहेर निघून जातो. मात्र मागे राहिलेले दोन भिक्षू परित्त पठनाचा मुख्य भाग प्रथमापासून पठनास सुरू करतात. वेळोवेळी, कालांतराने त्यांची आखणी दोन भिक्षुद्वारे विश्रांतीसाटी बदली केली जातात. त्यावेळी आटानाटीय सुत्ताला सुरूवात होते तेव्हा कधीकधी चार भिक्षू एकत्रित पठनास सुरूवात करतात आणि प्रथम भागाच्या अंतापर्यंत राहतात. (उदा. अप्पकञ्चे तुण्हिभूता तत्थेव' न्तराधायिंसु' ति)

ह्या क्षणी भिक्षूसंघाच्या गटातील बहुतेक भिक्षु दालनात प्रवेश करतात आणि पूर्वी दालनात असलेल्या भिक्षूबरोबर सहभागी होतता आणि पठन चालू ठेवतात किंवा नमस्कारासाठी हाताची ओंजळी जोडून शांतपणे श्रवण करीत राहतात.

(येथे परित्तपठनाचा शेवट होतो आणि पुढील क्रिया ग्रंथाच्या शेवटी दिलेली आहे ती पाहणे.)

# श्रीलंकेतील सार्वजनिक परित्तसंगायनाची पध्दती (सविस्तरपणे)

१) **आराधना**

**अ) विपत्तिपटिबाहाय, सब्बसम्पत्तिसिध्दिया ।**
**सब्बदुक्खविनासाय, परित्तं ब्रूथ मंगलं ।।**

सर्व विपत्तींचे निर्मुलन करण्यासाठी, सर्व प्रकारच्या संपत्तीच्या प्राप्तीसाठी, सर्व प्रकारच्या दुःखाचा नाश करण्यासाठी, (हे भन्ते) कृपया आपण कल्याणकारक परित्राण पाठ करावा.

**ब) विपत्तीपटिबाहाय, सब्बसम्पत्तिसिध्दिया ।**
**सब्बभयविनासाय, पत्तिं ब्रुथ मंगलं ।।**

सर्व विपत्तींचे निर्मुलन करण्यासाठी, सर्व प्रकारच्या संपत्तीच्या प्राप्तीसाठी, सर्व प्रकारच्या भयाचा उच्छेद करण्यासाठी, (हे भन्ते) कृपया आपण कल्याणकारक परित्राण पाठ करावा.

**क) विपत्तीपटिबाहाय, सब्बसम्पत्तिसिध्दिया ।**
**सब्बरोगविनासाय, पत्तिं ब्रुथ मंगलं ।।**

सर्व विपत्तींचे निर्मुलन करण्यासाठी, सर्व प्रकारच्या संपत्तीच्या प्राप्तीसाठी, सर्व प्रकारच्या रोगांचा विनाश करण्यासाठी, (हे भन्ते) कृपया आपण कल्याणकारक परित्राण पाठ करावा.

२) **अनुसासना - उपदेश**

ज्येष्ठ भिक्षूद्वारे श्रोत्यांच्या भाषेत उपदेशात्कम भाषण

३) **अ) नमस्कार**

नमो तस्स भगवतो, अरहतो, सम्मासम्बुद्धस्स ।
(मुख्य परित्त ग्रंथातील पाठ १ प्रमाणे)

**ब) सरणागमनं**

बुध्द समरणं गच्छामि । (मुख्य परित्त ग्रंथातील पाठ १ प्रमाणे)

**क) पंचशील**

मुख्य परित्तग्रंथातील पाठ २ प्रमाणे

**१) पणातिपाता वेरमणी स्खिापदं समादियामि ।**
**२) अदिन्नादाना वेरमणी स्खिापदं समादियामि ।**
**३) कामेसु मिच्छावारा वेरमणी स्खिापदं समादियामि ।**
**४) मुसावादा वेरमणी स्खिापदं समादियामि ।**
**५) सुरामेरयमज्जपमादट्ठाना वेरमणी स्खिापदं समादियामि ।**

४) **देवाराधना - देवांची आराधना**

**समन्ता चक्कवाळेसु, अत्रागच्छन्तु देवता ।**
**सध्दम्मं मुनिराजस्स सुणन्तु सग्गमोक्खदं ।।**

चक्रवाळातील सर्व देवगणांना येथे येऊ द्या आणि स्वर्ग व मोक्षाकडे (निर्वाणाकडे) घेऊन जाणाऱ्या मुनिराज भगवान बुध्दाच्या सध्दर्माचे श्रवण करून द्या.

५) **परित्तश्रवणाची वेळ जाहीर करणे.**

परित्तस्सवणकालो अयं भदन्ता । (तीन वेळा)
परित्तश्रवणाची ही वेळ आहे. (तीन वेळा)

६) **नमस्कार**

वर ३ खाली सांगितल्याप्रमाणे

७) **इतिपिसो भगवा अरहं -**

(मुख्य परित्तग्रंथ - पाठ १६ - धनग्गपरित्तं)

८) **स्वाक्खातो भगवता धम्मो**

(मुख्य परित्तग्रंथ पाठ १६ - धजग्गपिरत्तं)

९) **सपटिपन्नो भगवतो सावक संघो -**

(मुख्य परित्तग्रंथ पाठ १६ - धजग्गरित्तं)

१०) **आशिर्वाद**

एतेन सच्चवज्जेन पातु तं रतनत्तयं ।
ह्या सत्यवचनाने त्रिरत्ने तुझे रक्षण करोत ! (तीनदा)

११) **बुध्दाचे प्रथम शब्द**

**अनेकजातिसंसारं सन्धाविस्सं अनिब्बिसं ।**
**गहकारकं गवेसन्तो दुक्खा जाति पुनप्पुनं ।।**
**गहकारक ! दिट्ठोसि पुन गेहं न काहसि ।**
**सब्बा ते फासुका भग्गा गहकूटं विसङ्खितं ।**
**विसङ्खारगतं चित्तं तण्हानं खयमज्झगा'ति ।।**

कोठेही न थांबता, अनेक जन्मापर्यंत मी संसारात धावत राहिलो. भवरूपी संसारात अनेक जन्म घेऊन भ्रमण केले. ह्या कायारूपाने गृहास बनविणाऱ्या तृष्णेचा शोध करीत, पुनः पुन्हा मला दुःखमय जन्मात (जन्मचक्रात) पडावे लागले. हे गृहकारक तृष्णे, मी तुला (निश्चितच) पाहिले आहे. आता तू पुन्हा घर बांधू शकणार नाहीस. (पुन्हा देहधारण करण्याचे मला आता कारण राहिले नाही). तुझ्या सर्व कड्या (फसळ्या) भग्न (निकामी) झालेल्या आहेत आणि तुझ्या (देहरूपी) गृहाचे शिखर खाली पडले आहे. माझे चित्त संस्काररहित झाले आहे. माझ्या चित्ताला तृष्णाक्षयपद (अर्हतपद) प्राप्त झाले आहे.

१२. **पटिच्चसमुप्पाद - प्रतित्पसमुत्पाद (कार्यकारण संबंध)**

अविज्जापच्चया सङ्खारा, सङ्खारपच्चया विञ्ञाणं, विञ्ञाणापच्चया नामरूपं, नामरूपपच्चया सळायतनं, सळायतनपच्चया फस्सो, फस्सपच्चया वेदना, वेदनापच्चया तण्हा, तण्हापच्चया उपादानं, उपादानपच्चया भवो, भवपच्चया जाति, जातिपच्चया जरामरण सोकपरिदेवदुक्खदोमनस्सुपायासा सम्भवन्ति ।एकमेतस्स केवलस्स दुक्खक्खन्धस्स समुदयो होति ।

अविद्येपासून संस्कार, संस्कारपासून विज्ञान, विज्ञानापासून नामरूप, नामरूपापासून षडायतन, षडायतनापासून स्पर्श, स्पर्शापासून वेदना, वेदनेपासून तृष्णा, तृष्णेपासून उत्पादन, उपदानापासून भव, भवापासून जन्म, जन्मापासून जरा, मरण, शोक, आक्रोश, दुःख, मनस्ताप (दुर्मनस), चित्तप्रकोष हे उत्पन्न होतात. याप्रमाणे ह्या सर्व दुःखसमूहाचा उद्भव होतो.

अविज्जायत्वेव असेसविरागनिरोधा सङ्खारनिरोधो, सङ्खारनिरोधा विञ्ञाणनिरोधो,

विञ्ञाणनिरोधा नामरूपनिरोधो, नामरूपनिरोधा, सळायतननिरोधो, सळायतननिरोधा, फस्सनिरोधो, फस्सनिरोधा, वेदनानिरोधो, वेदनानिरोधा तण्हनिरोधो, तण्हानिरोधा उपादाननिरोधो, उपादाननिरोधा, भवनिरोधो, भवनिरोधा जातिनिरोधो, जातिनिरोधा जरामरणसोकपरिदेवदुक्खदोमनरस्सरायास निरूज्झन्ति । एकमेतस्स केवलस्स दुक्कक्खन्धस्स निरोधो होतीति ।

अविद्येचाच वैराग्याने (विरक्तीने) अशेष (पूर्णतया) निरोध (नाश) केला असता संस्कारांचा निरोध (नाश) होतो, संस्कारनिरोधाने विज्ञाननिरोधा, विज्ञाननिरोधाने नामरूपनिरोध, नामरूपनिरोधाने षडायतननिरोध, षडायतननिरोधाने स्पर्शनिरोध, स्पर्शनिरोधाने वेदनानिरोध, वेदनानिरोधाने तृष्णानिरोध, तृष्णानिरोधाने उपादाननिरोध, उपादानानिरोधाने भवनिरोध, भवनिरोधाने जन्मनिरोध, जन्मनिरोधान जरा, मरण, शोक परिदेव (आक्रोश), दुःख, मनस्ताप (उद्विगता), चित्तप्रकोप, यांचा निरोध होतो. याप्रमाणे सर्व दुःख समूहाचा निरोध (अंत-नाश) होतो.

**१३. जयमंगलगाथा - बुध्द विजयाच्या मंगलगाथा**

**बाहुं सहस्समभिनिम्मित सायुधं तं,**
**गिरिमेकलं उदितघोरससेनमारं ।**
**दानादि धम्मविदिना जितवा मुनिन्दो,**
**तं तेजसा भवतु ते जनमङ्गलानि ।।१ ।।**

ज्या मुनीन्द्र (बुध्दाने),सहस्त्र बाहू (हात) निर्माण करणाऱ्या व त्यामध्ये शस्त्रे धारण करणाऱ्या, गिरिमेखला नावाच्या हत्तीवर आरूढ झालेल्या, माराला त्याच्या अत्यंत भयानक सेनेसह आपल्या दानादी धार्मिक बळाच्या (शक्तीच्या) साहाय्याने पराजित केले, त्या (भगवान बुध्दाच्या) प्रतापामुळे (तेजामुळे) तुझे (अनेकविध) कल्याण होवो! (तुला विजयी कृपाछत्र लाभो !) ।।१ ।।

**मारातिरेकमभियुज्झित सब्बरत्तिं,**
**घोरम्पनालवकमक्खमथद्धयक्खं ।**
**खन्तीसुदन्तविधिना जितवा मुनिन्दो,**
**तं तेजसा भवतु ते जनमङ्गलानि ।।२ ।।**

ज्या मुनीन्द्राने (बुध्दाने), मारापेक्षा अधिक (क्रुर असणाऱ्या) यक्षाशी सर्व रात्रभर संग्राम करणाऱ्या, भयानक, अजिंक्य आणि हेकेखोर (दुराग्रही) असणाऱ्या आळवक नावाच्या यक्षाला, क्षान्ति (सहनशीलता) व श्रेष्ठ संयम (दमन) यांच्या बळाच्या मदतीने जिंकले (पराजित केले) त्या भगवान बुध्दाच्या तेजाच्या (प्रतापाच्या) प्रभावामुळे तुझे (अनेकविध) कल्याण होवो ! (तुला विजयी कृपाछत्र लाभो !) ।।२ ।।

**नालिगिरिं गजवरं अतिमत्तभूतं,**
**दावग्गिचक्कमसनीव सुदारूणन्तं ।**
**मेत्तम्बुसेकविधिना जितवा मुनिन्दो,**
**तं तेजसा भवतु ते जयमङ्गलानि ।।३ ।।**

ज्या मुनीन्द्राने (बुध्दाने), दावाग्निचक्र विजेप्रमाणे अतिशय दारूण (भयंकर) अशा अत्यंत उन्मत्त नालगिरी नावाच्या श्रेष्ठ हत्तीला, मैत्रीरूपी पाण्याच्या अभिषेकाने (शिडकावाने)

जिंकले, त्या (भगवान बुध्दाच्या) तेजाच्या प्रभावामुळे तुझे (अनेकविध) कल्याण होवो ! (तुला विजयी कृपाछत्र लाभो ! ) ।।३ ।।

**उक्खित्तखग्गमतिहत्थसुदारूणं तं,**
**थावंतियोजनपथङ्गुलिमालवं तं ।**
**इद्धीभिसंखतमनो जितवा मुनिन्दो,**
**तं तेजसा भवतु ते जयमङ्गलानि ।।४ ।।**

ज्या मुनीन्द्राने (बुध्दाने), हातात तलवार उचरून (प्रहार करण्यास सज्ज झालेल्या) आणि तीन योजन अंतरापर्यंत (तशा स्थितीत सतत धावणाऱ्या), अतिशय भयानक (क्रुर) अंगुलिमाल (दरोडेखोराला) दैवी (अतिमानवी) शक्तीच्या साहाय्याने जिंकले, त्या भगवान बुध्दाच्या तेजाच्या प्रभावामुळे तुझे (अनेकविध) कल्याण होवो ! (तुला विजयी कृपाछत्र लाभो !)

**कत्वान कट्ठमुदरं इव गब्भिनीया,**
**चिञ्चाय दुट्ठवचनं जनकायमज्झे ।**
**सन्तेन सोमविधिना जितवा मुनिन्दो,**
**तं तेजसा भवतु ते जयमङ्गलानि ।।५ ।।**

ज्या मुनीन्द्राने (बुध्दाने), पोटावर एखाद्या गर्भवती स्त्रीप्रमाणे काष्ट (लाकूड) बांधून (गर्भिणीप्रमाणे) सर्व लोकांच्या समूहामध्ये चिंचेची दुर्वचने (अपशब्द), आपल्या शांत व सौम्य स्वभावाच्या साहाय्याने जिंकले, त्या भगवान बुध्दाच्या प्रतापाने तुझे (अनेकविध) कल्याण होवो ! (तुला विजयी कृपाछत्र लाभो !) ।।५ ।।

**सच्चं विहाय मतिसच्चकवादकेतुं,**
**वादाभिरोपितमनं अतिअन्धभूतं ।**
**पञ्ञापदीपजलितो जितवा मुनिन्दो,**
**तं तेजसा भवतु ते जयमङ्गलानि ।।६ ।।**

ज्या मुनीन्द्राने (बुध्दाने), सत्याचा ज्याने त्याग केला होता, जो असत्याचा आश्रयदाता होता, जो अभिमानी, वादविवादपटू, अहंकाराने अत्यंत अन्ध बनलेला सच्चक नावाच्या परिव्राजकाला, आपला प्रज्ञादीप पेटवून जिंकले, त्या भगवान बुध्दाच्या प्रभावाने तुझे (अनेकविध) कल्याण होवो ! (तुला विजयी कृपाछत्र लाभो !) ।।६।।

**नन्दोपनन्दभुजगं विबुध्दं महिध्दि,**
**पुत्तेन थेरभुजगेन दमापयन्तो ।**
**इद्धपदेसविधिना जितवा मुनिन्दो,**
**तं तेजसा भवतु ते जयमङ्गलानि ।।७ ।।**

ज्या मुनीन्द्राने (बुध्दाने), महान दैवी शक्ती (महाऋध्दी) सम्पन्न नन्दोपन्द नावाच्या भुजंगाला (सापाला), नागाप्रमाणे असणारा आपला पुत्र (शिष्य) महामौद्गल्यायन बळाने जिंकले, त्या भगवान बुध्दाच्या प्रतापाने तुझे (अनेकविध) कल्याण होवो ! (तुला विजयी कृपाछत्र लाभो!) ।।७ ।।

**दुग्गाहदिट्ठिभुजगेन सुदट्ठहत्थं,**
**ब्रह्मं विसुद्धिजुतिमिद्धिबकाभिधानं ।**
**ञाणागदेन विधिना जितवा मुनिन्दो,**
**तं तेजसा भवतु ते जयमङ्गलानि ।।८।।**

ज्या मुनीन्द्राने (बुध्दाने), भयानक मिथ्या दृष्टिरूपी सापाकडून ज्याच्या हाताला दंश केला गेला होता त्या विशुध्द ज्योती (तेज) आणि दैवी शक्ती धारण करणाऱ्या बक नावाच्या ब्रह्माला (संन्याशाला), ज्ञानरूपी औषधाने जिंकले, त्या भगवान बुध्दाच्या प्रतापाने तुझे (अनेकविध) कल्याण होवो ! (तुला विजयी कृपाछत्र लाभो !) ।।८।।

**एतापि बुध्दजयमङ्गअट्ठगाथा,**
**यो वाचको दिनदिने सरते मतन्दी ।**
**हित्वान नेक विविधानि चुपद्दवानि,**
**मोक्खं सुखं अधिगम्येय नरो सपञ्ञो ।।९।।**

जो (प्रज्ञासंपन्न) पाठक बुध्दाच्या या आठ जयमंगलगाथाचे (बुध्द विजयाच्या आठ गाथा) निरालस भावनेने (दक्षतापूर्वक) प्रतिदिन (नियमितपणे) पठन व मनन करीत असतो, तो प्रज्ञासंपन्न मनुष्य नाना प्रकारच्या उपद्रवांपासून मुक्त होऊन, मोक्ष (निर्वाण) सुख प्राप्त करू शकतो ।।९।।

कधी कधी दुष्टप्रवृत्तीपासूनच्या रक्षणार्थ खालील विनंती येथे किंवा तीन सुत्रांच्या शेवटी म्हटली जाते.

**अ) यं दुन्निमित्तं अवमङ्गलञ्च, यो चामनापो सकुणस्स सद्दो ।**
**पापग्गहो दुस्सुपिनं अकन्तं, बुध्दानुभावेन विनासमेन्तु ।।**

जे वाईट निमित्त, अपशकून, पक्षांचे अप्रिय शब्द, पापग्रह, वाईट स्वप्न व दुःखकारक (प्रतिकूल) अवस्था आहेत, ते सर्व बुध्दाच्या प्रतापाने नाश पावोत !

**ब) यं दुन्निमित्तं अवमङ्गलञ्च, यो चामनापो सकुणस्स सद्दो ।**
**पापग्गहो दुस्सुपिनं अकन्तं, धम्मानिभावेन विनासमेन्तु ।।**

जे वाईट निमित्त, अपशकून, पक्षांचे अप्रिय शब्द, पापग्रह, वाईट स्वप्न व दुःखकारक (प्रतिकूल) अवस्था आहेत, ते सर्व धर्माच्या प्रतापाने नाश पावोत !

**क) यं दुन्निम्त्तिं अवमङ्गलञ्च, यो चामनापो सकुणस्स सद्दो ।**
**पापग्गहो दुस्सुपिनं अकन्तं, संघानुभावेन विनासमेन्तु ।।**

जे वाईट निमित्त, अपशकून, पक्षांचे अप्रिय शब्द, पापग्रह, वाईट स्वप्न व दुःखकारक (प्रतिकूल) अवस्था आहेत, ते सर्व संघाच्या प्रतापाने नाश पावोत !

**१४) कृपाछत्रासाठी सदिच्छा**

**१) भवतु सब्बमंगलमं, रक्खन्तु सब्बदेवता ।**
**सब्ब बुध्दानुभावेन सदा सोत्थि भवन्तु ते ।।**

बुध्दाच्या प्रतापाने तुझे सर्व मंगल (कुशल) होवो. सर्व देवता तुझे रक्षण करोत आणि सर्वकाळ तुझे कल्याण होवो !

२) **भवतु सब्बमंगलमं, रक्खन्तु सब्बदेवता ।**

**सब्ब धम्मानुभावेन सदा सोत्थि भवन्तु ते ।।**

धम्माच्या प्रतापाने तुझे सर्व मंगल (कुशल) होवो. सर्व देवता तुझे रक्षण करोत आणि सर्वकाळ तुझे कल्याण होवो !

३) **भवतु सब्बमंगलमं, रक्खन्तु सब्बदेवता ।**

**सब्ब संघानुभावेन सदा सोत्थि भवन्तु ते ।।**

संघाच्या प्रतापाने तुझे सर्व मंगल (कुशल) होवो. सर्व देवता तुझे रक्षण करोत आणि सर्वकाळ तुझे कल्याण होवो !

**१५) अ) वाईटापासून रक्षणार्थ विनंति - (तीनवेळा म्हणावे)**

**नक्खंत्तयक्खभूतानं, पापग्गहनिवारणा ।**

**परित्तस्सानुभावेन हन्तु तेसं उपद्दवे ।।**

नक्षत्र, यक्ष, भूत व वाईट ग्रहदोष तसेच त्यांचे सर्व उपद्रव ह्या परित्राणपाठाच्या प्रतापाने नष्ट होवोत !

ब) **रक्षण निश्चित करणे**

**सब्बे बुध्दा बलप्पत्ता, पच्चेकानञ्च यं बलं**

**अरहन्तोनञ्च तेजेन, रक्खं बन्धाम सब्बसो ।।**

आम्ही सर्व बलसंपन्न बुध्दाच्या, प्रत्येक बुध्दाच्या व अरहंताच्या प्रतापाने सर्व प्रकाराने (तुमच्या रक्षणासाठी) हे रक्षाबंधन बांधीत आहोत.

**१६) तीन सूत्रांचे संगायन (निरूपण)**

**अ) महामंगलसुत्त (ग्रंथपाठ-७)**

**ब) रतनसुत्त (ग्रंथ पाठ -८)**

**क) करणीयमेत्तसुत्त (ग्रंथ पाठ -९)**

प्रत्येक सूत्राच्या शेवटी-एतेन सच्चवज्जेन पातुं तं रतनत्तयं - तीनदा म्हणावे.

**१७) महाजयमंगलगाथा - श्रेष्ठ आणि विजयी कल्याणाच्या गाथा**

**महाकारूणिको नाथो हिताय सब्बपाणिनं,**

**पुरेत्वा पारमी सब्बा पत्तो सम्बोधिमुत्तमं ।**

**एतेन सच्चवज्जेन होतु ते जयमङ्गलं ।।१ ।।**

महाकारूणिक भगवान बुध्दाने सर्व प्राण्यांच्या हिताकरीता दहा पारमिता पूर्ण करून उत्तम अशी संबोधि (ज्ञान) प्राप्त केली, या सत्य वचनाने तुमचे कल्याण होवो ।।१ ।।

**जयन्तो बोधिया मूले सक्यानं नन्दिवड्ढनो ।**

**एवं तुय्हं जयो होतु जयस्सु जयमङ्गलं ।।२ ।।**

शाक्य वंशाला आनंद देणाऱ्या भगवान बुध्दाने बोधिवृक्षाखाली ध्यानस्थ बसून जसा (मार सेनेचा पराभव करून) विजय मिळविला, त्याचप्रमाणे तमुचे जय होवो व कल्याण होवो ! ।।२ ।।

**सक्कत्वा बुध्दरतनं ओसधं उत्तमं बरं,**
**हितं देवमनुस्सानं बुध्दतेजेन सोत्थिना ।**
**नस्सन्तुपद्दवा सब्बे दुक्खा वूपसमेन्तु ते ।।३ ।।**

उत्तम आणि श्रेष्ठ औषध अशा बुध्दरत्नाचा सत्कार करून, जो देव व मनुष्यासाठी हितकारी आहे, त्या बुध्दाच्या प्रतापाने तुमचे कल्याण होऊन तुमचे सर्व उपद्रव नष्ट होवोत आणि तुमची सर्व दुःखे शांत होवोत ।।३ ।।

**सक्कत्वा धम्मरतनं ओसधं उत्तमं बरं,**
**परिलाहूपसमनं धम्मतेजेन सोत्थिना ।**
**नस्सन्तुपद्दवा सब्बे भया वूपसमेन्तु ते ।।४ ।।**

उत्तम आणि श्रेष्ठ औषध अशा धम्मरत्नाचा सत्कार करून, जो पीडा शांत करणारा आहे. त्या धम्माच्या प्रतापाने तुमचे कल्याण होऊन तुमचे सर्व उपद्रव नष्ट होवोत आणि तुमची सर्व भय शांत होवोत ! ।। ४ ।।

**सक्कत्वा संघरतनं ओसधं उत्तमं बरं,**
**आहुणेय्यं पाहुणेय्यं संघतेजेन सोत्थिना ।**
**नस्सन्तुपद्दवा सब्बे रोगा वूपसमेन्तु ते ।।५ ।।**

उत्तम आणि श्रेष्ठ औषध अशा संघरत्नाचा सत्कार करून, जो आमंत्रण करण्यास व पाहुणचार करण्यास योग्य आहे. त्या संघाच्या प्रतापाने तुमचे कल्याण होऊन तुमचे सर्व उपद्रव नष्ट होवोत आणि तुमची सर्व भय शांत होवोत ! ।। ४ ।।

**यं किञ्चि रतनं लोके विज्जति विविथां पुथु,**
**रतनं बुध्द समं नत्थि, तस्मा सोत्थि भवन्तु ते ।।६ ।।**

जगात जी काही विभिन्न प्रकारची अलग अलग रत्ने अस्तित्वात आहेत, त्यामध्ये बुध्द रत्नांची बरोबरी करणारे एकही रत्न नाही, या सत्य वचनाने तुमचे कल्याण होवो ।।६ ।।

**यं किञ्चि रतनं लोके विज्जति विविथां पुथु,**
**रतनं धम्म समं नत्थि, तस्मा सोत्थि भवन्तु ते ।।७ ।।**

जगात जी काही विभिन्न प्रकारची अलग अलग रत्ने अस्तित्वात आहेत, त्यामध्ये धम्म रत्नांची बरोबरी करणारे एकही रत्न नाही, या सत्य वचनाने तुमचे कल्याण होवो ।।७ ।।

**यं किञ्चि रतनं लोके विज्जति विविथां पुथु,**
**रतनं संघ समं नत्थि, तस्मा सोत्थि भवन्तु ते ।।८।।**

जगात जी काही विभिन्न प्रकारची अलग अलग रत्ने अस्तित्वात आहेत, त्यामध्ये संघ रत्नांची बरोबरी करणारे एकही रत्न नाही, या सत्य वचनाने तुमचे कल्याण होवो ।।८।।

**नत्थि मे सरणं अञ्ञं बुध्दो मे सरणं वरं,**
**एतेन सच्चवज्जेन होतु ते जयमङ्गलं ।।९ ।।**

बुध्द याशिवाय अन्य कोणतेही शरण स्थान (आधार) मला नाही. बुध्द माझे उत्तम शरणस्थान आहे, ह्या सत्य वचनाचे तुमचे कुशल व मंगल होवो ! ।।९ ।।

**नत्थि मे सरणं अञ्ञं धम्मो मे सरणं वरं,**
**एतेन सच्चवज्जेन होतु ते जयमङ्गलं ।।१०।।**

धम्म याशिवाय अन्य कोणतेही शरण स्थान (आधार) मला नाही. बुध्द माझे उत्तम शरणस्थान आहे, ह्या सत्य वचनाचे तुमचे कुशल व मंगल होवो ! ।।१०।।

**नत्थि मे सरणं अञ्ञं संघो मे सरणं वरं,**
**एतेन सच्चवज्जेन होतु ते जयमङ्गलं ।।११।।**

संघ याशिवाय अन्य कोणतेही शरण स्थान (आधार) मला नाही. बुध्द माझे उत्तम शरणस्थान आहे, ह्या सत्य वचनाचे तुमचे कुशल व मंगल होवो ! ।।११।।

**सब्बीतियो विविज्जन्तु सब्बरोगो विनस्सतु,**
**मा ते भवतु अन्तरायो सुखी दिघायुको भव ।।१२।।**

(तुझी) सर्व संकटे दूर होवोत, (तुझी) सर्व दुःख व रोग नष्ट होवोत, (तुला) विघ्न बाधींचा आघात न होवो, (तू) सुखी व दिर्घायुषी होवोस ! ।।१२।।

**भवतु सब्बमङ्गलं रक्खन्तु सब्बदेवता,**
**सब्बबुध्दानुभावेन सदा सोत्थि भवन्तु ते ।।१३।।**

तुझे सर्व मंगल होवो आणि सर्व देवता तुझे रक्षण करोत, सर्व बुध्दाच्या प्रतापाने तुझे सर्वदा कल्याण होवो ! ।।१३।।

**भवतु सब्बमङ्गलं रक्खन्तु सब्बदेवता,**
**सब्बधम्मानुभावेन सदा सोत्थि भवन्तु ते ।।१४।।**

तुझे सर्व मंगल होवो आणि सर्व देवता तुझे रक्षण करोत, सर्व धम्माच्या प्रतापाने तुझे सर्वदा कल्याण होवो ! ।।१४।।

**भवतु सब्बमङ्गलं रक्खन्तु सब्बदेवता,**
**सब्बसंघानुभावेन सदा सोत्थि भवन्तु ते ।।१५।।**

तुझे सर्व मंगल होवो आणि सर्व देवता तुझे रक्षण करोत, सर्व संघाच्या प्रतापाने तुझे सर्वदा कल्याण होवो ! ।।१५।।

**नक्खत्तयक्खभूतानं पापग्गहनिवारणा,**
**परित्तस्सानुभावेन हन्तु तेसं उपद्दवे ।।१६।।**

नक्षत्र, यक्ष, भूत व वाईट ग्रहदोष तसेच त्यांचे सर्व उपद्रव हे सर्व या परित्राणपाठाच्या प्रतापाने नष्ट होवोत ।।१६।।

येथे संपूर्ण परित्त ग्रंथाच्या पठनाचा शेवट होतो आणि पुढील पध्दती ह्या ग्रंथाच्या शेवटी दिलेली आहे.

# महापरित्राण पाठ

## नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा सम्बुध्दस्स

### १ - सरणागमनं

**बुध्दं सरणं गच्छामि ।**

**धम्मं सरणं गच्छामि ।**

**संघं सरणं गच्छामि ।**

**दुतियम्पि बुध्दं सरणं गच्छामि ।**

**दुतियम्पि धम्मं सरणं गच्छामि ।**

**दुतियम्पि संघं सरणं गच्छामि ।**

**ततियम्पि बुध्दं सरणं गच्छामि ।**

**ततियम्पि धम्मं सरणं गच्छामि ।**

**ततियम्पि सङ्घं सरणं गच्छामि ।**

---

त्या भगवंताला, अर्हताला, सम्यक सम्बुध्दाला नमस्कार असो !

**१. शरणगमन**

मी बुध्दाला अनुसरतो,

मी धम्माला अनुसरतो,

मी संघाला अनुसरतो,

दुसऱ्यांदा मी बुध्दाला अनुसरतो,

दुसऱ्यांदा मी धम्माला अनुसरतो,

दुसऱ्यांदा मी संघाला अनुसरतो,

तिसऱ्यांदा मी बुध्दाला अनुसरतो,

तिसऱ्यांदा मी धम्माला अनुसरतो,

तिसऱ्यांदा मी संघाला अनुसरतो.

# २ - दससिक्खापदानि

१. पाणातिपाता वेरमणी सिक्खापदं समादियामि ।

२. अदिन्नादाना वेरमणी सिक्खापदं समादियामि ।

३. अब्रह्मचरिया वेरमणी सिक्खापदं समादियामि ।

४. मुसावदा वेरमणी सिक्खापदं समादियामि ।

५. सुरामेरय मज्जपमादट्ठाना वेरमणी सिक्खापदं समादियामि ।

६. विकाल भोजना वेरमणी सिक्खपादं समादियामि ।

७. नच्चगीत वादित विसूक दस्सना वेरमणी सिक्खापदं समादियामि ।

८. माला गन्धविलेपन धारण मण्डन विभूसनट्ठाना वेरमणी सिक्खापदं समादियामि ।

---

## २. दहा शिक्षापदे (दहा प्रतिज्ञा)

१. मी जीवहिंसेपासून अलिप्त राहण्याची प्रतिज्ञा करतो.

२. मी चोरी करण्यापासून अलिप्त राहण्याची प्रतिज्ञा करतो.

३. मी कामवासनेच्या अनाचारापासून अलिप्त राहण्याची प्रतिज्ञा करतो.

४. मी खोटे बोलण्यापासून अलिप्त राहण्याची प्रतिज्ञा करतो.

५. मी मद्य, तसेच मोहात पाडणाऱ्या मादक पदार्थांच्या सेवनापासून अलिप्त राहण्याची प्रतिज्ञा करतो.

६. मी अवेळी भोजन करण्याच्या सवयीपासून अलिप्त राहण्याची प्रतिज्ञा करतो.

७. मी नृत्य, गायन, वादन आणि कठपुतळ्यांच्या खेळांसारख्या मनोरंजनापासून अलिप्त राहण्याची प्रतिज्ञा करतो.

८. मी पुष्पमाला, सुगंधी द्रव्ये व उटणी धारण करण्यापासून व शरीरास अलंकृत व विभूषित करणाऱ्या वस्तूंपासून अलिप्त राहण्याची प्रतिज्ञा करतो.

९. उच्चासयन महासयना वेरमणी सिक्खापदं समादियामि।

१०. जातरूपरजत पटिग्गहणा वेरमणी सिक्खापदं समादियामि ।

## ३ - सामणेर पञ्हो

१. एक नाम किं ? सब्बे सत्ता आहरट्ठितिका ।

२. द्वे नाम किं ? नामञ्च रूपञ्च ।

३. तीणि नाम किं ? तिस्सो वेदना ।

४. चत्तारि नाम किं ? चत्तारि अरियसच्चानि ।

५. पञ्च नाम किं ? पञ्चुपादानक्खन्धा ।

६. छ नाम किं ? छ अज्झत्तिकानि आयतनानि ।

७. सत्त नाम किं ? सत्त बोज्झङ्गा ।

---

९. मी उंच व मोठमोठ्या (मौल्यवान) आसनांपासून व शय्यांपासून अलिप्त राहण्याची प्रतिज्ञा करतो.

१०. मी सोने व चांदी ग्रहण करण्यापासून अलिप्त राहण्याची प्रतिज्ञा करतो.

**३. सामणेर-प्रश्न**

१. एक (धर्म) म्हणजे काय ? सर्व प्राणी आहारावर जगणारे आहेत.

२. दोन वस्तू कोणत्या ? नाम (अदृश्य वस्तू-मन) व रूप (दृश्य वस्तू-शरीर).

३. तीन वस्तू कोणत्या ? तीन प्रकारच्या वेदना, (सुख, दुःख, असुखदुःख-उपेक्षा).

४. चार वस्तू कोणत्या ? चार आर्यसत्ये (दुःख, दुःखाचे कारण, दुःखाचा निरोध व दुःखाच्या निरोधाचा मार्ग)

५. पाच वस्तू कोणत्या ? पाच उपादान (वासना) स्कंध. (रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान)

६. सहा वस्तू कोणत्या ? सहा प्रकारची आंतरिक (अध्यात्मिक) आयतने. (चक्षू, श्रोतृ, घ्राण, जिव्हा, काया व मन)

७. सात वस्तू कोणत्या ? सात बोध्यंगे (स्मृती, धर्मविचय, वीर्य, प्रीती, प्रश्रब्धी, समाधी आणि उपेक्षा)

८. अट्ठ नाम किं ? अरियो अट्ठङ्गिको मग्गो,

९. नव नाम किं ? नव सत्तावासा ।

१०. दस नाम किं ? दसहङ्गेहि समन्नागतो अरहाति वुच्चतीति।

## ४ - व्दत्तिंसाकारो

अत्थि इमस्मिं काये केसा लोमा नखा दन्ता तचो, मंसं नहारू अट्ठि अट्ठिमिञ्जा वक्कं, हदयं यकनं किलोमकं पिहकं पप्फासं, अन्तं अन्तगुणं उदरियं करीसं, पित्तं सेम्हं पुब्बो लोहितं सेदो मेदो, अस्सु वसा खेलो, सिङ्घनिका लसिका मुत्तं मत्थके मत्थलुङ्गन्ति ।

---

८. आठ वस्तू कोणत्या ? आर्य अष्टांगिक मार्ग. सम्यक दृष्टी (सम्यक संकल्प, सम्यक वाचा, सम्यक् कर्म, सम्यक् आजीव (आजीविका), सम्यक व्यायाम, (प्रयत्न) सम्यक् स्मृती व सम्यक् समाधी).

९. नऊ वस्तू कोणत्या ? नऊ प्रकारच्या प्राण्यांची वस्तिस्थाने. (लोकावचार व रूपावचार भूमीवरील पाच आवास आणि अरूपावचर भूमीवरील चार आवास).

१०. दहा वस्तू कोणत्या ? दहा अंगानी युक्त असणारा अर्हत (अरहन्त) (आर्य अष्टांगिक मार्ग आणि ज्ञान व विमुक्ती).

### ४. बत्तीस प्रकारचे घटक (पदार्थ)

या शरीरामधील पुढीलप्रमाणे बत्तीस प्रकारचे घटक (पदार्थ) आढळतात. डोक्यावरील केस, शरीरावरील केस (लोम), नख, दात, त्वचा, मांस, स्नायू, अस्थी (हाडे), हाडातील मऊ पदार्थ (अस्थिमज्जा), मूत्राशय, हृदय, यकृत, क्लोम, प्लीहा, फुफ्फुस, आतडे (मोठे), आतड्यांची दोरी (लहान आतडे) उदरातील अन्न (वस्तू), विष्टा, पित्त, कफ (श्लेष्म), पू, रक्त, घाम (स्वेद), मेद, अश्रु, चरबी, थुंकी (लाळ), शेंबुड, लस, मुत्र व मस्तकातील मेंदू.

## ५ - पच्चवेक्खणा

पटिसङ्खा योनिसो चीवरं पटि सोवामि, यावदेव सीतस्स पटिघाताय उण्हस्स पटिघाताय डंस मकस वातातप सिरिंसप सम्फस्सानं पटिघाताय यावदेव हिरिकोपीन पटिच्छादनत्थं ।

पटिसङ्खायोनिसो पिण्डपातं पटिसेवामि, नेवदवाय न मदाय न मण्डनाय न विभूसनाय यावदेव इमस्स कायस्स ठितिया यापनाय विहिंसूपरतिया ब्रम्हचरियानुग्गहाय इति पुराणञ्च वेदनं पटिहङ्खामि नवञ्च वेदनं न उप्पादेस्सामि यात्रा च मे भविस्सति अनवज्जता च फासूविहारो चाति ।

---

### ५. प्रत्यवेक्षण (आत्मपरिक्षण)

मी साधकबाधक पुर्णतया सुयोग्य विचार करूनच, थंडी व उष्णता, यांच्यापासून संरक्षण मिळविण्यासाठी, डास, चिलटे, उन, वारा व सरपटणाऱ्या (सापविंचवासारख्या) प्राण्यांपासून होणाऱ्या पीडेपासून मुक्त होण्यासाठी, तसेच जनलज्जा व मनलज्जा यांपासून रक्षण मिळविण्यासाटी भिक्षुवस्त्रांचा (चीवरांचा) उपयोग करतो.

मी संपूर्ण साधकबाधक पूर्णतया सुयोग्य विचार करूनच, मौज, डौल, मंडन, आभूषण म्हणून हौशीने नव्हे तर शरीरयापनासाठी, भुकेच्या पीडेचे शमन करण्यासाठी व ब्रम्हचर्यात (पवित्र जीवनात) सहाय्यभूत होण्यासाठी मी भिक्षापात्राचे (भिक्षेत मिळालेल्या अन्नाचे) सेवन करतो व अशा रितीने मी माझ्या भुकेमुळे होणारी जुनी पीडा (उपासमार) दूर करीन, नवी पीडा उत्पन्न होऊ देणार नाही व माझी जीवनयात्रा निर्दोष रीतीने व सुखकरपणे चालू ठेवीन.

**पटिसङ्खा योनिसो सेनासनं पटिसेवामि, यावदेव सीतस्स पटिघाताय उण्हस्स पटिघाताय, डंस मकस वातातप सिरिंसप सम्फस्सानं पटिघाताय यावदेव उतुपरिस्सय विनोदनं पटिसल्लानारामत्थं ।**

**पटिसङ्खा योनिसो गिलानपच्चय भेसज्ज परिक्खारं पटिसेवामि, यावदेव उप्पनानं वेय्याबाधिकानं वेदनानं पटिघाताय अब्यापज्झ परमतायाति ।**

## ६ - दसधम्म सुत्तं

**भिक्खूनं गुणसंयुत्तं, यं देसेसि महामुनि ।**
**यं सुत्वा पटिपज्जन्तो, सब्बदुक्खा पमुच्चति**
**सब्बलोकहितत्थाय, परित्तं तं भणामहे ।।**

---

मी पूर्णपणे सारासार असा सुयोग्य विचार करूनच शयन व आसनाचा उपयोग करीत असतो; जेणेकरून मला थंडी व ऊन यांपासून त्रास होऊ नये, डास, चिलटे, ऊन वारा आणि (साप-विंचवासारख्या) सरपटणाऱ्या प्राण्यांपासून पीडा होऊ नये, निरनिराळ्या ऋतूंपासून होणाऱ्या त्रासापासून मुक्त होण्यासाठी व एकान्तातील मनन चिन्तन सहजसुलभ व्हावे म्हणून मी शयनासनाचे सेवन करतो.

मी संपूर्ण सारासार असा सुयोग्य विचार करूनच रोगातुरांसाठी वापरण्याची औषधे व इतर वस्तूंचा उपयोग करतो, जेणेकरून उत्पन्न झालेग्या व्याधींचे व पीडांचे (व्यथांचे) शमन व्हावे व निरोगता प्राप्त व्हावी.

### ६. दशधर्म सूत्र

ज्याचे श्रवण करून अनुसरण केल्याने माणूस सर्व दुःखापासून मुक्य होऊ शकतो, अशा ज्या मुल्यवान (गुणकारी) रक्षणमंत्राचा महामुनी भगवान बुध्दाने भिक्षुंना उपदेश केला, त्या रक्षणमंत्राचे (सुरक्षास्तोत्राचे) पठन सर्व लोकांच्या हितासाठी आम्ही करीत आहोत.

**एवं मे सुतं, एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । तत्र खो भगवा भिक्खू आमन्तेसि :- भिक्खवोति । भदन्तेति ते भिक्खू भगवतो पच्चसोसुं । भगवा एतदवोच :-**

**दस इमे, भिक्खवे, धम्मा पब्बजितेनअभिण्हं पच्चवेक्खितब्बा । कतमे दस ?**

**१) वेवण्णियम्हि अज्झूपगतोति, पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बं ।**

**२) परपटिबध्दा में जीविकाति पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बं ।**

**३) अञ्ञो मे आकप्पो करणीयोति पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बं ।**

---

मी असे एकले आहे की, कएकदा भगवान बुध्द श्रावस्तीमध्ये अनाथपिण्डिकाच्या उद्यानातील जेतवन विहारात राहत असत. त्यावेळी भगवन्तांनी एक दिवस ''भिक्षुंनो !'' म्हणून संबोधन केले. ''काय भगवंत'' असे म्हणून भिक्षूंनी त्यांना प्रतिसाद दिला. त्यावर भगवंत म्हणाले :

भिक्षूंनो, संन्यस्त (प्रव्रजित) भिक्षूंनी, या दहा गोष्टीसंबंधी नेहमी मनन (चिन्तन) करावे. कोणत्या दहा गोष्टीसंबंधी ? तर-

१) मी आता (गृहस्थापेक्षा) एका निराळ्याच जीवनात आलो आहे, अशा प्रकारे भिक्षूने (प्रव्रजिताने) नेहमी मनन (विचार) केला पाहिजे.

२) माझी उपजिविका (माझे भरणपोषण) दुसऱ्या लोकांवर अवलंबित (आधारित) आहे. असा विचार प्रव्रजिताने सदासर्वदा केला पाहिजे.

३) आता माझी जीवन पध्दती (गृहस्थापेक्षा) निराळी (भिन्न) असली पाहिजे, असा विचार प्रव्रजिताने सदासर्वदा केला पाहिजे.

**४) कच्चि नु खो मे अत्ता सीलतो न उपवदती ति पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बं ।**

**५) कच्चि नु खो मं अनुविच्च विञ्ञू सब्रह्मचारी सीलतो न उपवदन्ती ति पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बं ।**

**६) सब्बेहि मे पियेहि मनापेहि नानाभावो विनाभावोति, पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बं ।**

**७) कम्मस्सकोम्हि कम्मदायादो, कम्मयोनि, कम्मबन्धु, कम्मपटिसरणो । यं कम्मं करिस्सामि कल्याणं वा पापकं वा तस्स दायादो भविस्सामीति, पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बं ।**

---

४) माझा अन्तरात्मा व्रतपालनाच्या (धर्माज्ञा अनुसरण्याच्या) बाबतीत माझी निंदा तर करीत नाही ना ? असा विचार प्रव्रजिताने सदासर्वदा केला पाहिजे.

५) माझे विद्वान सहब्रह्मचारी भिक्षू माझ्या वर्तनाचे अवलोकन करून (माझे गुरूबन्धू) माझ्या व्रतपालनासंबंधी (धर्माज्ञाचे पालन करण्याविषयी) माझी निंदा तर करीत नाहीत ना?' (माझ्यावर दोषारोपण तर करीत नाही ना ?) असा विचार प्रव्रजिताने सदासर्वदा केला पाहिजे.

६) माझ्या सर्व लाडक्या व प्रिय बान्धव आणि मित्रांपासून मला अलग व्हावयाचे आहे. माझी व त्यांची ताटातूट व्हावयाची आहे, अशा प्रकारे प्रव्रजिताने (भिक्षूने) नेहमी विचार (मनन) करावयास पाहिजे.

७) मी माझ्या कर्माचा परिपाक आहे. मला माझ्या कर्माचाच वारसा मिळणार आहे. कर्म हीच माझी माता आहे. माझी कर्मेच माझे बान्धव (नातलग) आहेत. मी जे कर्म करीन ते केल्यामुळे मी त्या कर्माचा वारस (उत्तराधिकारी) बनेन, अशा प्रकारे प्रव्रजिताने नेहमी मनन करावयास पाहिजे.

८) कथंम्भूतस्स मे रत्तिं दिवा वीतिपतन्तीति, पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बं ।

९) 'कच्चि नु खोहं सुञ्ञागरे अभिरमामीति, पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बं ।

१०) अत्थि नुखो मे उत्तरिमानुस्स धम्मा, अलमरियञाण दस्सनविसेसो अधिगतो, सोहं पच्छिमे काले सब्रह्मचारीही पुट्ठो न मङ्कु भविस्सामीति, पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बं ।

'इमे खो भिक्खवे दस धम्मा पब्बजितेन अभिण्हं पच्चवेक्खितब्बाति । इदमवोच भगवा, अत्तमना ते भिक्खू भगवन्तं अभिनन्दुति।

---

८) माझे दिवस व माझ्या रात्री कोणत्या मनस्थितीत व्यतीत होत आहेत ? अशा प्रकारे प्रव्रजिताने (भिक्षूने) नेहमी विचार (मनन) करावयास पाहिजे.

९) शुन्यागरात (एकान्तवासात) मी रममाण होत आहे काय ? अशा प्रकारे प्रव्रजिताने (भिक्षूने) नेहमी विचार (मनन) करावयास पाहिजे.

१०) मी अतिमानवी सिध्दी प्राप्त केल्या आहेत काय? मी आर्याद्वारा (भगवान बुध्दाच्या शिष्यांद्वारा) अर्जीत (प्राप्त केले जाणारे) विशेष ज्ञान व दर्शन प्राप्त केले आहे काय? की ज्या कारणाने माझ्या जीवनाच्या अंतिम समयी माझ्या सहब्रह्मचारी (गुरूबन्धु) भिक्षूंनी मला त्यासंबंधी विचारले असता, मी लज्जित होऊन त्यांच्या प्रश्नाचे उत्तर देण्यास असमर्थ होईन ? अशा प्रकारे प्रव्रजिताने (भिक्षूने) नेहमी मनन (चिन्तन) केले पाहिजे.

भिक्षुंनो, प्रव्रजिताने या दहा महत्वाच्या गोष्टीविषयी नेहमी मनन व चिन्तन केले पाहिजे. भगवान बुध्दाने हे सर्व भिक्षूंना उद्देशून म्हटले. भगवन्तांचे भाषण ऐकून सन्तुष्ट झालेल्या भिक्षूंनी भगवन्तांचे आभार मानले (अभिनन्दन केले).

# ७ - महामंगल सुत्तं

य मंगलं द्वादससु चिन्तयिंसु सदेवका ।
सोत्थानं नाधिगच्छन्ति अट्ठतिंसञ्च मंगलं ।।
देसितं देवदेवेन सब्बपापविनासनं ।
सब्बलोकहितत्थाय परित्तं (मंगलं) तं भणामहे ।।

एवं में सुत्तं । एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । अथ खो अञ्ञतरा देवता अभिक्कन्ताय रत्तिया अभिक्कन्तवण्णा केवलकप्पं जेतवनं ओभासेत्वा येन भगवा तेनुपसङ्कमि उपसङ्कमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं अट्ठासि । एकमन्तं ठिता खो सा देवता भगवन्तं गाथाय अज्झभासि:-

---

## महामंगल सूत्र

ज्या मंगल वस्तूंविषयी देवमनुष्यांनी पुष्कळ विचार केला असतानाही त्यांना स्वतःची सुरक्षितता प्राप्त करून घेता आली नाही व ज्याच्या साहाय्याने सर्व पापांचा नाश करणाऱ्या ज्या अडतीस मंगल वस्तूंचा देवांचा देव अशा बुध्दाने सर्व लोकांच्या हितासाठी बारा श्लोकात उपदेश केला त्या परित्राणसूत्रा (मंगलसुत्रा) चे आम्ही पठन करीत आहोत.

असे मी ऐकले आहे की, एके समयी भगवान श्रावस्ती येथे अनाथपिण्डिकांच्या जेतवनात आरामात राहत होते. तेव्हा रात्र संपत आली असता एक अत्यंत सुंदर देवता, सर्व जेतवन प्रकाशित करून भगवन्तापाशी आली व तेथे येऊन भगवन्तांना वंदन करून एका बाजूला उभी राहिली. एका बाजूस उभ्या राहिलेल्या त्या देवतेने भगवन्तांना संबोधून खालील गाथा म्हटली :-

बहू देवा मनुस्सा च, मङ्गलानी अचिन्तयुं ।
आकंखमाना सोत्थानं, ब्रुहि मङ्गलमुत्तमं ।।१।।

असेवाना च बालानं, पण्डितानं च सेवना ।
पूजा च पूजनियानं, एतं मङ्गलमुत्तमं ।।२।।

पतिरूपदेसवासो च, पुब्बे च कतपुञ्ञता ।
अत्तसम्मापणिधि च, एतं मङ्गलमुत्तमं ।।३।।

बाहुसच्चं च सिप्पं च, विनयो च सुसिक्खितो ।
सुभासिता च या वाचा, एतं मङ्गलमुत्तमं ।।४।।

मातापितु उपट्ठानं, पुत्तदारस्स सङ्गहो ।
अनाकुला च कम्मन्ता, एतं मङ्गलमुत्तमं ।।५।।

---

१) (देवतेने विचारले) - अनेक देवांनी आणि माणसांनी आपले रक्षण (कल्याण) व्हावे या उद्देशाने मंगल वस्तूंविषयी (कल्पना) विचार केला आहे. त्यातील उत्तम मंगल कोणते, ते आपण मला सांगा.

२) (भगवान म्हणाले) - मूर्खांच्या सहवासापासून दूर राहणे, पंडितांची संगत करणे व पूजनीय माणसांची पूजा करणे, हे उत्तम मंगल आहे.

३) अनुकूल प्रदेशात निवास करणे, भूतकाळात (पूर्वजन्मी) पुण्य केलेले असणे व स्वतःला सन्मार्गास लावणे, हे उत्तम मंगल आहे.

४) ''विद्या संपादन करणे, कला आत्मसात करणे, प्रयत्नपुर्वक विनयशील आचार करणे व चांगली वाणी उच्चारणे, हे उत्तम मंगल आहे.''

५) आईवडिलांची सेवा करणे, बायकोमुलांचा सांभाळ करणे आणि सरळ मार्गाने केलेले कर्म, हे उत्तम मंगल आहे.

दानं च धम्मचरिया च, ञातकानं च सङ्गहो ।
अनवज्जानि कम्मानि, एतं मङ्गलमुत्तमं ।।६ ।।

आरति विरति पापा, मज्जपाना च सञ्ञमो ।
अप्पमादो च धम्मेसु, एतं मङ्गलमुत्तमं ।।७ ।।

गारवो च निवातो च, सन्तुट्ठी च कतञ्ञुता ।
कालेन धम्मसवणं, एतं मङ्गलमुत्तमं ।।८ ।।

खन्ती च सोवचस्सता, समणानं च दस्सनं ।
कालेन धम्मसाकच्छा, एतं मङ्गलमुत्तमं ।।९ ।।

तपो च ब्रह्मचरियं च, अरियसच्चान दस्सनं ।
निब्बाणसच्छिकिरिया च, एतं मङ्गलमुत्तमं ।।१० ।।

---

६) दानधर्म करणे, धार्मिक आचार, नातलगांना मदत करणे व योग्य कर्मे करणे, हे उत्तम मंगल आहे.

७) पापकर्मामध्ये रममाण न होता त्यांच्यापासून निवृत्त होणे, मद्यपानाच्या बाबतीत संयम ठेवणे आणि धार्मिक कृत्यांविषयी दक्षता बाळगणे, हे उत्तम मंगल आहे.

८) आदर, नम्रता, संतोष कृतज्ञता आणि वेळोवेळी सध्दर्माचे श्रवण करणे, हे उत्तम मंगल आहे.

९) क्षमावृत्ती, गोडवाणी, श्रमणांचे दर्शन करणे व वारंवार धर्मचर्चा करणे (धर्माविषयी जिज्ञासा बाळगणे), हे उत्तम मंगल आहे.

१०) (पापक्षालनासाठी) तपश्चर्या करणे, पवित्र आचरण करणे (ब्रह्मचर्य पाळणे), आर्यसत्यांचे ज्ञान करून घेणे व निर्वाणाचा साक्षात्कार, हे उत्तम मंगल आहे.

''फुट्ठस्स लोकधम्मेहि, चित्तं यस्स न कम्पति ।
असोकं विरजं खेमं एतं मङ्गलमुत्तमं'' ।।११।।

एतादिसानि कत्वान सब्बत्थमपराजिता ।
सब्बत्थ सोत्थिं गच्छन्ति, तं तेसं
मङ्गलमुत्तमन्ति ।।१२।।

---

११) जगातील सर्वसामान्य अनुभवांनी (लाभालाभ, यशापयश, निन्दाप्रशंसा व सुखदुःख) यांचा अनुभव झाल्याने ज्याचे चित्त विचलित होत नाही, पण शोकरहित, निर्मळ व सुखरूप राहते, हे (त्या माणसाचे) उत्तम मंगल आहे.

१२) अशा प्रकारच्या गोष्टींचे आचरण करून (केल्यावर) कोठेही पराभव न पावता जी माणसे क्षेमकुशलतेचे (निर्विघ्नतेचे) सुख प्राप्त करतात, तेच त्यांचे उत्तम मंगल आहे.

# ८ - रतन सुत्तं

एकदा वैशाली नगर भीषण दुष्काळाच्या कचाट्यात सापडले असता तेथील गरीब माणसे रोगपिडीत होऊन पटापट मरू लागली. नगरीत इतस्ततः सडणारी मृतशरीरे पसरलेली असल्यामुळे क्षुद्र जीवजन्तुंचे थवे नगरीत घोंगाऊ लागले आणि त्यामुळे प्राणघातक रोग (महामारी) पसरू लागले. भीषण दुष्काळ, महामारी व प्राणघातक जीवजन्तूंच्या (प्रेतांच्या) उपस्थितीमुळे भयभीत झालेल्या नगरजनांनी, त्या समयी राजगृहात निवास करणाऱ्या भगवान बुध्दाची मदत मागितली. भगवान बुध्द आपला उपस्थायक आनन्द आणि पुष्कळशा भिक्षूंसह वैशालीस गेले. भगवान बुध्दांचे वैशालीस आगमन झाल्याबरोबर, तेथे जोराचा पाऊस पडू लागला आणि त्यामुळे नगरीत सडणारी प्रेते वाहून गेली. नगरातील वातावरण शुध्द झाले व नगर पुन्हा स्वच्छ झाले.

तदनंतर भगवान बुध्दाने आनंदास 'रत्नसुत्रा' चा उपदेश केला आणि वैशालीतील नगरजनांचे रक्षण करण्याचे उपयुक्त साधन म्हणून रतनसूत्राचा उपदेश करीत, आदरणीय आनंदाने कशा प्रकारे लिच्छवी प्रजाजनांसह वैशाली नगरीत भ्रमण करावे, त्या संबंधी त्याला सूचना दिल्या (मार्गदर्शन केले). तदनंतर त्या सूचनांचे पालन करीत आदरणीय आनंद यांनी भगवान बुध्दाच्या भिक्षापात्रातील पवित्र पाण्याचा तेथे (वैशाली नगरीत) शिडकावा केला. त्यामुळे तेथे जमा झालेले पाणी, अरिष्ठ नगरातून पळून गेले आणि साथीची रोगराई (महामारी) निर्मुल झाली. तदनंतर आदरणीय आनंद वैशालीच्या नागरिकांसह, भगवान बुध्द आपल्या भिक्षुंसह, ज्या नगरगृहात (सभागृहात) त्यांची वाट पाहत जमले होते, तेथे परतले. तेव्हा, भगवान बुध्दाने तेथे जमलेल्या जनसमुहाला त्या 'रतसुत्ताचा' (रत्नसूत्राचा) उपदेश केला.

**कोटीसतसहस्सेसु चक्कवाळेसु देवता,**
**यस्साणं पटिगण्हन्ति, यञ्च वेसालियं पुरे ।**
**रोगामनुस्सदुब्भिक्खसम्भूतं तिविधं भयं,**
**खिप्पमेन्तरधापेसि परित्तं तं भणामहे ।।**

ज्यांच्या आज्ञाचे पालन एक लाख करोड देवता करीत असून ज्यांनी वैशाली नगराला रोग, अमानुष, भय व दुष्काळ या तीनही प्रकारच्या उत्पन्न झालेल्या भयापासून अगदी लवकरच ज्या परित्राणाने मुक्त केले, तोच भयनाशक परित्राण (रक्षणपाठ) आम्ही म्हणत आहोत -

यानीध भूतानि समागतानि
भुम्मानि वा यानिव अन्तलिक्खे ।
सब्बे' व भूता सुमना भवन्तु,
अथो'पि सक्कच्च सुणन्तु भासितं ।।१ ।।

तस्मा हि भूता निसामेथ सब्बे,
मेत्तं करोथ मानुसिया पजाय ।
दिवाच रत्तोच हरन्ति ये बलिं,
तस्मा हि ने रक्खथ अप्पमत्ता ।।२ ।।

यं किञ्चि वित्तं इध वा हुरं वा,
सग्गेसु वा यं रतनं पणीतं ।
न नो समं अत्थि तथागतेन,
इदम्पि बुध्दे रतनं पणीतं ।
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।३ ।।

---

१) ''या पृथ्वीवर किंवा अन्तरिक्षात (आकाशात) जन्म पावलेले जे काही प्राणी या ठिकाणी जमले आहेत, त्या सर्वांची मने आनंदित होवोत आणि ते प्राणी ही सुवचने आदरपुर्वक ऐकोत.

२) म्हणून सर्व प्राणिमात्रांनो, ऐका. तुम्ही मनुष्यजातीवर प्रेम (मैत्री) करा. ही जी सर्व माणसे रात्रंदिवस तुम्हाला समर्पण, दान देतात, त्यांचे तुम्ही दक्षतेने रक्षण करा.

३) या जगतात किंवा परलोकात जे काही धन (वित्त) असेल किंवा स्वर्गामध्ये जे काही उत्तम रत्न असेल, ते आमच्या तथागत बुध्दांच्या तोडीचे असणार नाही. बुध्दाचे ठायी असणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनाने सर्वत्र कल्याण होवो!

खयं विरागं अमतं पणीतं,
यदज्झगा सक्यमुनी समाहितो ।
न तेन धम्मेन सम'त्थि किञ्चि,
इदम्पि धम्मे रतनं पणीतं ।
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।४।।

यं बुध्दसेट्ठो परिवण्णयी सुचिं,
समाधि-मानन्तरि कञ्ञमाहू ।
समाधिना तेन समो न विज्जति,
इदम्पि धम्मे रतनं पणीतं ।
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।५।।

ये पुग्गला अट्ठ सतं पसत्था,
चत्तारि एतानि युगानि होन्ति ।
ते दक्खिणेय्या सुगतस्स सावका,
एतेसु दिन्नानि महप्फलानि ।
इदम्पि सङ्घे रतनं पणीतं,
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।६।।

---

४) ध्यानस्थ शाक्यमुनीने (बुध्दाने) तृष्णाक्षयमय, वासनाविरहित (विरागमय) असे जे श्रेष्ठ अमरत्व (निर्वाण) प्राप्त केले, त्या निर्वाणगामी धर्मासारखा दुसरा मार्ग नाही. धर्माचे ठायी असणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनाने सर्वत्र कल्याण होवो !

५) ज्या शुध्द समाधीची बुध्दश्रेष्ठाने प्रशंसा केली, जिला ताबडतोब फळ देणारी म्हणतात, त्या समाधीसारखे दुसरे काहीही अस्तित्वात नाही. धर्माचे ठायी वसणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनामुळे सर्वत्र कल्याण होवो !

६) सज्जनांना प्रशंसनीय वाटणारे असे आठ प्रकारचे पुरूष, ज्यांच्या चार जोड्या होतात. ते सुगम बुध्दाचे शिष्य दक्षिणापात्र आहेत, त्यांना दिलेली दाने महाफलदायी होतात. संघाचे ठायी बसणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनामुळे सर्वत्र कल्याण होवो !

ये सुप्पयुत्ता मनसा दल्हेन,
निक्कामिनो गोतमसासनम्हि ।
ते पत्तिपत्ता अमतं विगय्ह,
लध्दा मुधा निब्बुतिं भुञ्जमाना ।
इदम्पि सङ्घे रतनं पणीतं,
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।७।।

यथिन्दखीलो पठविंसितो सिया,
चतुब्भि वातेभि असम्पकम्पियो ।
तथूपमं सप्पुरिसं वदामि,
यो अरियसच्चानि अवेच्च पस्सति ।
इदम्पि सङ्घे रतनं पणीतं,
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।८।।

---

७) जे पुरूष दृढ मनाने व निष्काम चित्ताने गौतमाच्या धर्माप्रमाणे आचरण करण्याचा योग्य रीतीने प्रयत्न करतात व प्राप्तव्य निर्वाणीची प्राप्ती करून अमृतामध्ये अवगाहन करतात ते अनायसे मिळवलेल्या शांतीचा उपभोग करतात. संघाचे ठायी वसणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनामुळे सर्वत्र कल्याण होवो !

८) नगरद्वारासमोर जमिनीत उभारलेला इन्द्रस्तंभ जसा चारी बाजूच्या (दिशांच्या) वाऱ्यामुळे हालत नाही, त्याप्रमाणे जो मनुष्य चार आर्य सत्यांचे ज्ञान प्राप्त करून, ती सत्ये विचारपूर्वक जाणतो (स्विकारतो), त्या सत्पुरूषाला मी इन्द्रस्तंभाची उपमा देतो. संघाचे ठायी वसणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनामुळे सर्वत्र कल्याण होवो !

ये अरियसच्चानि विभावयन्ति,
गम्भीरपञ्ञेन सुदेसितानि ।
किञ्चापि ते होन्तिभुसप्पमीत्ता,
न ते भवं अट्ठमं अदियन्ति ।
इदम्पि सङ्घे रतनं पणीतं,
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।९।।

सहावस्स दस्सनसमप्दाय,
तयस्सु धम्मा जहिता भवन्ति ।
सक्कायदिट्ठि विचिकिच्छितञ्च,
सीलब्बतं वापि यदत्थि किञ्चि ।
चतूहपायेहि च विप्पमुत्तो
छचाभिट्ठानानि अभब्बो कातुं ।
इदम्पि सङ्घे रतनं पणीतं,
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।१०।।

---

९) गंभीर प्रज्ञेच्या बुध्दाने उपदेशिलेली चार आर्यसत्ये जे पुरूष पुर्णपणे आकलन करून घेतात, ते जरी कितीही बेसावधपणे वागले, तरी त्यांना यापुढे आठवा जन्म प्राप्त होत नाही. संघाच्या ठायी बसणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनाने सर्वत्र कल्याण होवो !

१०) माणसाला सम्यकदृष्टी प्राप्त झाल्याबरोबर त्याची सत्कायदृष्टी, विचिकित्सा (अश्रध्दा) व व्रतवैकल्यावरील अंधविश्वास या तीन गोष्टींचा तो त्याग करतो. तो मनुष्य चार दुर्गतीपासून (नरकवास, पशुयोनीत जन्म, प्रेतयोनीत जन्म व असुरयोनीत जन्म) मुक्त होतो व सहा गोष्टी त्याच्या हातून घडणे असंभवनीय होते. (मातृघात, पितृघात, अरहन्तघात, तथागताला जखम करणे व बुध्देतर गुरूचा शिष्य होणे). संघाचे ठायी वसणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनामुळे सर्वत्र कल्याण होवो !

किञ्चापिसो कम्मं करोति पापकं,
कायेन वाचा उद चेतसा वा ।
अभब्बो सो तस्स पटिच्छादाय,
अभब्बता दिट्ठपदस्स वुत्ता ।
इदम्पि सङ्घे रतनं पणीतं,
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।११।।

वनप्पगुम्बे यथा फुस्सितग्गे,
गिम्हानमासे पठमस्मिं गिम्हे ।
तथूपमं धम्मवरं अदेसयी,
निब्बानगामिं परमं हिताय ।
इदम्पि बुध्दे रतनं पणीतं,
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।१२।।

वरो वरञ्ञू वरदो वराहरो,
अनुत्तरो धम्मवरं अदेसयी ।
इदम्पि बुध्दे रतनं पणीतं,
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ।।१३।।

---

११) जर अशा माणसाद्वारा कायेने, वाणीने अथवा मनाने काही पाप घडले तर तो मनुष्य ते पाप झाकून ठेवील हे अशक्य आहे, कारण निर्वाणपदाचा साक्षात्कार झालेल्या माणसाच्या हातून असले (लपवालपवीचे) कृत्य होणे शक्य नाही, असे म्हटले आहे. संघाचे ठायी वसणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनामुळे सर्वत्र कल्याण होवो !

१२) उन्हाळ्याच्या पहिल्या महिन्यात जसा एखाद्या घनघोर अरण्यात (झाडीत) एखाद्या शाखाउपशाखांनी बहरलेला वृक्ष असावा, त्याप्रमाणे बुध्दाने निर्वाणगामी परमश्रेष्ठ असा धर्म लोकहितासाठी उपदेशिला आहे. बुध्दाचे ठायी असलेले हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनामुळे सर्वत्र कल्याण होवो !

१३) श्रेष्ठ, श्रेष्ठ जाणणाऱ्या, श्रेष्ठ देणाऱ्या, अनुत्तर अशा बुध्दाने सर्वोत्तम धर्म उपदेशिला आहे. बुध्दाचे ठायी वसणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनामुळे सर्वांचे कल्याण होवो !

खीणं पुराणं नवं नत्थि सम्भवं,
विरत्तचित्ता आयतिके भवस्मिं ।
ते खीणबीजा अविरूल्हिच्छन्दा,
निब्बन्ति धीरा यथायम्पदीपो ।
इदम्पि सङ्घे रतनं पणीतं,
एतेन सच्चेन सुवत्थि होतु '' ।।१४।।

यानीध भूतानि समागतानि
भुम्मानि वा यानिव अन्तलिक्खे ।
तथागतं देवमनुस्सपूजितं,
बुध्दं नमस्साम, सुवत्थि होतु ।।१५।।

---

१४) ज्यांचे जुने कर्म क्षीण झाले आहे व नवीन कर्म जे करीत नाहीत, जे भविष्य काळातील कर्मांविषयी निरपेक्ष आहेत ते क्षीणबीज आहेत (ज्याचे फळ प्राप्त करून देणारे कर्म निष्ठ झाले आहे.) व ज्यांना कर्माच्या फळाची इच्छा नाही ते धीरपुरूष या प्रदीपाप्रमाणे निर्वाण पावतात, संघाचे ठायी वसणारे हे उत्तम रत्न आहे. या सत्यवचनामुळे सर्वत्र कल्याण होवो !

१५) जे भुमीवर किंवा आकाशातील प्राणी येथे जमले असतील (त्यांना मी म्हणतो की), आम्ही देवमनुष्यपूजित तथागत बुध्दाला वंदन करतो. त्यामुळे सर्वत्र कल्याण होवो!

यानीध भूतानि समागतानि,
भुम्मानि वा यानिव अन्तलिक्खे ।
तथागतं देवमनुस्सपूजितं,
धम्मं नमस्साम, सुवत्थि होतु ।।१६।।

यानीध भूतानि समागतानि,
भुम्मानि वा यानिव अन्तलिक्खे ।
तथागतं देवमनुस्सपुजितं,
संघं नमस्साम, सुवत्थि होतु ।।१७।।

---

१६) जे भुमिगत किंवा अन्तरिक्षातील प्राणी येथे जमले असतील (त्यांना मी म्हणतो की), आम्ही देवमनुष्य पूजित तथागत संघाला नमस्कार करतो. त्यामुळे सर्वत्र कल्याण होवो !

१७) जे भुमिगत किंवा अवकाशातील (अंतरिक्षातील) प्राणी येथे जमले असतील (त्यांना मी म्हणतो की,) आम्ही देवमनुष्यपूजित तथागत धर्माला नमस्कार करतो. त्यामुळे सर्वत्र कल्याण होवो !

# ९ - करणीय मेत्त सुत्तं

यस्सानुभावतो यक्खा नेव दस्सेन्ति भिंसनं ।
यम्हि चे वानुयुञ्जन्तो रत्तिं दिवं अतन्दितो ।
सुखं सुपति सुत्तो च पापं किञ्चि न पस्सति ।
एवं आदिगुणोपेतं परित्तं तं भणामहे ।।

करणीयमत्थ कुसलेन,
यं तं सन्तं पदं अभिसमेच्च ।
सक्को उजू च सूजू च,
सुवचो चस्स मुदु अनतिमानी ।।१।।
सन्तुस्सको च सुभरोच,
अप्पकिच्चोच सल्लहुकवुत्ति ।
सन्तिन्द्रियो च निपको च,
अप्पगब्भो कुलेसु अनुगिध्दो ।।२।।

---

### कर्तव्यदक्ष मैत्री सूत्र

ज्याच्या प्रभावामुळे यक्ष हिंसेचे प्रदर्शन करीत नाहीत, ज्याचे रात्रंदिवस दक्षतेने पालन केल्याने माणूस सुखाने झोपु शकतो व झोपेत काहीही वाईट स्वप्ने पाहात नाही, अशा प्रकारचे गुण धारण करणाऱ्या रक्षणसुत्रांचे आम्ही पठन करीत आहोत.

१) स्वहित साधण्यात कुशल (आत्मविश्वास) माणसाने निर्वाणाच्या शांत पदाची प्राप्ती ज्ञानमार्गाने प्राप्त करून घेण्यासाठी समर्थ, ऋजुमार्गी, गोड बोलणारा, मृदू आणि निरभिमानी (निगर्वी) असावे (व्हावे).

२) तो संतोषी, भरणपोषण करण्यास सुलभ,अधिक उलाढाल्या न करणारा, साधेपणाने वागणारा, शांत इन्द्रियांचा, हुशार (चतुर), अप्रगल्भ (धृष्ट नसणारा) व कुटुंबाविषयी जास्त लोभ न बाळगणारा असावा.

न च खुद्दं समाचरे किञ्चि,
येन विञ्ञू परे उपवदेय्युं ।
सुखिनो वा खेमिनो होन्तु,
सब्बे सत्ता भवन्तु सुखितत्ता ।।३ ।।

ये केचि पाणभूतत्थि,
तसा वा थावरा वा अनवसेसा ।
दीघा वा ये महन्ता वा,
मज्झिमा रस्सकाणुकथूळा ।।४ ।।

दिट्ठा वा येव अद्दिट्ठा,
येचदूरे वसन्ति अविदूरे ।
भूता वा सम्भवेसी वा,
सब्बे सत्ता भवन्तु सुखितत्ता ।।५ ।।

---

३) जेणेकरून (ज्या कारणाने) सुज्ञ (शहाणी) माणसे इतरांना दोष देतात, असे क्षुद्र (हीन) आचरण त्याने करू नये, सर्व प्राणी सुखी, भयमुक्त (क्षेमकुशल) व आनंदित होवोत (अशी इच्छा-भावना त्याने करावी)

४) (या जगात) जे कोणी चर (जंगम) किंवा स्थावर, लांब किंवा मोठे, मध्यम आकारांचे, लहान आकारांचे. सुक्ष्म आणि स्थूल प्राणी

५) जे दृष्टीस पडणारे किंवा दृष्टीस न पडणारे असतात, जे दूर राहणारे किंवा जवळ राहणारे असतात, जे उत्पन्न झालेले (जन्मास आलेले) किंवा उत्पन्न होणारे (जन्मास येणारे) असतात, ते सर्व प्राणी आनंदात (सुखात) राहोत !

न परो परं निकुब्बेथ
नातिमञ्ञेथ कत्थचिनं कञ्चि ।
ब्यारोसना पटिघसञ्ञा,
नाञ्ञमञ्ञस्स दुक्खमिच्छेय्य ।।६।।

माता यथा नियंपुत्तं,
आयुसा एकपुत्त मनुरक्खे ।
एवम्पि सब्ब भूतेसु,
मानसं भावये अपरिमाणं ।।७।।

मेत्तं च सब्ब लोकस्मिं,
मानसं भावये अपरिमाणं ।
उध्दं अधो च तिरियञ्च,
असम्बाधं अवेरं असपत्तं ।।८।।

---

६) माणसे एकमेकांना न फसवोत ! ते कोठेही एकमेकांची अवज्ञा न करोत (अपमान न करतो) ! ते रागामुळे किंवा द्वेषबुध्दीने एकमेकांना दुःख देण्याची इच्छा न करोत!

७) ज्याप्रमाणे आई आपल्या स्वतःच्या एकुलत्या एक पुत्राचे आपले आयुष्य (आपला जीव) धोक्यात घालूनही रक्षण करते, त्याचप्रमाणे माणसाने सर्व प्राणिमात्रांविषयी अमर्याद प्रेम बाळगावे.

८) माणसाने अखिल जगातील प्राण्यांविषयी वर (आकाशात), खाली (पाताळात) व चोहोबाजूला निवास करणाऱ्या सर्व प्राणिमात्रांविषयी वैरभावविरहित, शत्रुत्वहीन मैत्रीची अमर्याद भावना वाढवावी.

तिट्ठं चरं निसिन्नोवा,
सयानो वा यावतस्स विगतमिध्दो
एतं सतिं अधिट्ठहेय्य,
ब्रह्ममेतं विहारं इधमाहू ।।९ ।।
दिठिञ्च अनुपगम्म,
सीलवा दस्सनेन सम्पन्नो ।
कामेसु विनेय्य गेधं,
न हि जातु गब्भसेय्यं पुनरेतीति ।।१० ।।

## १० - खन्धपरित्तं

सब्बासिविसजातीनं दिब्बमत्तागदं विय ।
यं नासेसि विसं घोरं सेसं चापि परिस्सयं ।
आणखेत्तम्हि सब्बत्थ सब्बदा सब्बपाणीनं,
सब्बसो पि विनासेति परित्तं तं भणामहे ।।

---

९) माणसाने उभे असण्याच्या स्थितीत, चालत असतांना, बसलेला असतांना, अथवा अंथरूणात पहुडलेल्या स्थितीत असतांना, जोपर्यंत तो निद्रावश झालेला नसतो, तोपर्यंत (ही मैत्रीभावनेची) स्मृती कायम ठेवावी. ह्या स्मृतीलाच इहलोकी ब्रम्हजीवन म्हणतात.

१०) माणसाने मिथ्या दृष्टीचा अवलंब न करता, शीलवान व ज्ञानसंपन्न होऊन, कामसुखाविषयीच्या आसक्तीचा त्याग केल्यास त्याला खात्रीने पुनर्जन्म प्राप्त होत नाही.

### खन्दपरित्राण

सर्व जातीच्या सापांच्या घोर विषाचा जो दैवी औषधाप्रमाणे नाश करतो आणि भगवान बुध्दाच्या आज्ञाक्षेत्रातील प्राणिमात्रांची सर्व संकटे नष्ट करतो, त्या रक्षणमंत्राचे आम्ही पठन करीत आहोत.

एवं मे सुतं, एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । तेन खो पन समयेन सावत्थियं अञ्ञतरो भिक्खु, अहिना दट्ठो कालकतो होति । अथखो सम्बहुला भिक्खु येन भगवा तेनुपसङ्कमिंसु उपसङ्कमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं निसीदिंसु, एकमन्तं निसिन्ना खो ते भिक्खू भगवन्तं एतदवोचुं :- इध भन्ते, सावत्थियं अञ्ञतरो भिक्खु अहिना दट्ठो कालकतो ति । नहनून सो भिक्खवे, भिक्खु चत्तारि अहिराज कुलानि मेत्तेन चित्तेन फरि, सचे हि सो भिक्खवे भिक्खु चत्तारि अहिराजकुलानि मेत्तेन चित्तेन फरेय्य, नहि सो भिक्खवे, भिक्खु अहिना दट्ठो कालं करेय्य । कतमानि चत्तारि अहिराजकुलानि ?

---

मी असे ऐकले आहे की एकदा भगवान बुध्द श्रावस्ती नगरीत अनाथपिण्डिकाच्या आरामात (उद्यानात) राहत होते. त्या समयी श्रावस्ती नगरीत कोणी एक भिक्षू सर्पदंशामुळे मरण पावला. तदनंतर पुष्कळसे भिक्षू भगवान बुध्दाकडे गेले व भगवन्तांना वंदन करून एका बाजूला बसले. एका बाजूस बसलेले ते भिक्षू भगवान बुध्दास म्हणाले, ''भगवान येथे श्रावस्ती नगरात कोणी एक भिक्षू सर्पदंशाने मरण पावला आहे.'' भिक्षुंनो, नक्कीच त्या भिक्षूने चार सर्पराजकुलांना मैत्रीयुक्त मनाने स्पर्श केला नसावा. भिक्षूंनो, जर त्या भिक्षूने चार सर्पराजकूलांना मैत्रीयुक्त मनाने स्पर्श केला असता तर भिक्षुंनो, तो भिक्षू सर्पदंशाने मरण पावला नसता. सर्पराजांची चार कुळे (कुटुंबे) कोणती ?

**विरूपक्खं अहिराजकुलं, एरापथं अहिराजकुलं, छब्यापुत्तं अहिराजककुलं, कण्हगोतमकं अहिराजकुलं ।**

**नहनून, सो भिक्खवे, भिक्खु इमानि चत्तारि अहिराजकुलानि मेत्तेन चित्तेन फरि । सचे हि सो भिक्खवे, भिक्खु इमानि चत्तारि अहिराजकुलानि मेत्तेन चित्तेन फरेय्य, न हि सो भिक्खवे, भिक्खु अहिना दट्ठो कालं करेय्य । अनुजानामि भिक्खवे, इमानि चत्तारि अहिराजकुलानी मेत्तेन चित्तेन फरितुं, अत्तगुत्तिया अत्तरक्खाय अत्तपरित्तायाति । इदमवोच भगवा, इदं वत्वा सुगतो अथापरं एतदवोच सत्थाः-**

**विरूपक्खेही मे मेत्तं, मेत्तं एरापथेही मे ।**
**छब्यापुत्तेहि मे मेत्तं, मेत्तं कण्हागोतमकेहि च ।।१।।**

---

विरूपक्षाचे सर्पराजकुळ, एरापथाचे सर्पराजकुळ, छब्यापुत्राचे सर्पराजकुळ व कृष्णगौतमाचे सर्पराजकुळ.

भिक्षुंनो, नक्कीच त्या भिक्षुने या चार सर्पराजकुळांना मैत्रीयुक्त चित्ताने स्पर्श केला नव्हता. भिक्षुंनो, जर त्या भिक्षुने या चार सर्पराजकुळांना मैत्रीयुक्त मनाने स्पर्श केला असता तर तो भिक्षू सर्पदंशाने मरण पावला नसता. भिक्षूंनो, मी तुम्हाला या चार सर्पराजकुळांना मैत्रीयुक्त मनाने स्पर्श करण्याची आज्ञा करतो आपल्या स्वतःच्या रक्षणासाठी, सुरक्षेसाठी व परित्राणासाठीच. भगवान बुध्दाने त्या प्रसंगी वरील (हे) शब्द उच्चारले व भिक्षूंना असे सांगितल्यावर शास्त्याने (भगवान बुध्दाने) असे म्हटले :-

१) विरूपक्षाच्या सर्पराजाकुळाशी माझी मैत्री आहे, एरापथाच्या सर्पराजकुळाशी माझी मैत्री आहे, छब्यापुत्राच्या सर्पराजकुळाशी माझी मैत्री आहे व कृष्णगौतमाच्या सर्पराज कुळाशीही माझी मैत्री आहे.

**अपादकेहि मे मेत्तं, मेत्तं दिपादकेहि मे ।**
**चतुप्पदेहि मे मेत्तं, मेत्तं बहुप्पदेहि मे ।।२।।**

**मा मं अपादको हिंसि, मा मं हिंसि दिपादको ।**
**मा मं चतुप्पदो हिंसि, मा मं हिंसि बहुप्पदो ।।३।।**

**सब्बे सत्ता, सब्बे पाणा, सब्बे भूता च केवला ।**
**सब्बे भद्रानि पस्सन्तु, मा कञ्चि पापमागमा'' ।।४।।**

**अप्पमाणो बुध्दो, अप्पमाणो धम्मो, अप्पमाणो सङ्घो । पमाणवन्तानि सिरिंसपानि, अहिविच्छिका, सतपदी, उण्णानाभि, सरबू मूसिका । कता मे रक्खा । कता मे परित्ता । पटिक्कमन्तु भुतानि । सोहं नमो भगवतो नमो सत्तनं सम्मासम्बुध्दानन्ति ।**

---

२) अपाद (पायाशिवायच्या) प्राण्यांशी माझी मैत्री (मित्रता) आहे, द्विपाद प्राण्यांशी माझी मैत्री आहे, चतुष्पाद प्राण्यांशी माझी मैत्री आहे व बहुपाद प्राण्यांशीही माझी मैत्री आहे.

३) अपाद प्राणी माझी हिंसा न करो । द्विपाद प्राणी माझी हिंसा न करो ! चतुष्पाद प्राणी माझी हिंसा न करो व बहुपाद प्राणी पण माझी हिंसा न करो !

४) सर्व सत्व. सर्व प्राणी, सर्व जीव, सर्वांना त्यांचे कल्याण प्राप्त होवो ! कोणीही कसलाही पापाचार न करो !

बुध्द, धर्म व संघ प्रमाणरहित (असीमीत) आहेत. परंतु सर्व सरपटणारे प्राणी - साप, विंचू, घोणी, कोळी, पाली व उंदिर ह्यासारखे प्राणी-सिमीत आहेत. मी माझ्या रक्षणाची व परित्राणाची व्यवस्था केली आहे. सर्व प्राणीमात्रांनी माझ्यापासून दूर व्हावे. मी भगवान बुध्दाला नमस्कार करीत आहे. मी सात सम्यक् सम्बुध्दांना नमस्कार करीत आहे.

## ११ - मेत्तनिसंस सुत्तं

अग्गिक्खन्धो पमं सुत्वा, जातसंवेगभिक्खूनं ।
अस्सादत्थाय देसेसि, यं परित्तं महामुनी ।
सब्बलोकहितत्थाय, परित्तं तं भणामहे ।।

**एवं मे सुतं, एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । तत्र खो भगवा भिक्खू आमन्तेसि भिक्खवोति । भदन्तेति ते भिक्खू भगवतो पच्चस्सोसुं । भगवा एतदवोच :-**

**मेत्ताय भिक्खवे चेतोविमुत्तिया, आसेविताय भाविताय बहुलीकताय, यानीकताय वत्थुकताय अनुट्ठिताय परिचिताय सुसमारध्दाय, एकादसानिसंसा पाटिकङ्खा कतमे एकादस ?**

---

### ११. मैत्रीभावनेचे लाभ सूत्र

अग्गिक्खन्धोपमं सूत्र ऐकल्यानंतर जेव्हा भिक्षूंच्या मनात धार्मिक उत्तेजना (प्रेरणा, संवेग) उत्पन्न झाली, त्या समयी त्यांना निर्मळ आनंद (सुख) देण्यासाठी महामूनी गौतमाने जो रक्षणमंत्र त्यांना उपदेशिला, त्या रक्षणमंत्राचे पठन सर्व जगताच्या हितासाठी आम्ही करीत आहोत.

मी ऐकले आहे की, एकदा भगवान बुध्द श्रावस्ती नगरात जेतवनात अनाथपिण्डिकाच्या आरामात (उद्यानात) राहात होते. तेथे भगवन्तांनी भिक्षूंना उद्देशून म्हटले - ''भिक्षूंनो !'' त्यावर भिक्षूंनी - ''होय, भगवंत'' असे म्हणून प्रत्युत्तर दिले. नंतर भगवंतांनी म्हटले.

भिक्षुंनो, चित्ताला विमुक्त करणारी जी मैत्रीभावना ती अंगी बाणविल्याने, आत्मसात केल्याने, तिचे आचरण केल्याने, तिच्याप्रमाणे वर्तन केल्याने, तिला मनामध्ये दृढ बनविल्याने, तिच्याशी पूर्णपणे परिचित झाल्याने, त्या मैत्रीभावनेने ओतप्रोत झाल्याने आणि त्या मैत्रीभावनेचा चांगला आरंभ केल्याने, माणसाने त्या मैत्रीभावनेपासून अकरा प्रकारच्या फायद्यांची अपेक्षा करावी. अकरा प्रकारचे फायदे कोणते ?

सुखं सुपति, सुखं पटिबुज्झति, न पापकं सुपिनं पस्सति, मनुस्सानं पियो होति, अमुनस्सानं पियो होति, देवता रक्खन्ति, नास्स अग्गि वा विसं वा सत्थं वा कमति, तुवटं चित्तं समाधियति, मुखवण्णो विप्पसीदति, असम्मुल्हो कालं करोति, उत्तरिं अप्पटिविज्झन्तो ब्रह्मलोकूपगो होति।

मेत्ताय भिक्खवे चेतो विमुत्तिया, आसेविताय, भाविताय बहुलीकताय, यानीकताय, वत्थुकताय अनुट्ठिताय परिचिताय सुसमारध्दाय, इमे एकादसनिसंसा पाटिकङ्खाति ।

इदमवोच भगवा । अत्तमना ते भिक्खू भगवतो भासितं अभिनन्दुन्ति ।

---

(ज्या माणसाच्या मनात मैत्रीभावनेचा निवास असतो) तो मनुष्य सुखाने झोपतो, आनंदयुक्त मनाने झोपेतून जागा होतो. त्याला काहीही त्रासदायक असे वाईट स्वप्न झोपेत पडत नाही. तो माणसांमध्ये लोकप्रिय होतो. तो (भूत, प्रेत, यक्ष, किन्नर, देव, दानव, वगैरे संकल्पनेतुन)अमनुष्यांमध्ये सुध्दा प्रिय होतो, सत्पुरूष त्याचे रक्षण करतात. अग्नी, विषबाधा किंवा शस्त्र यांच्यामुळे त्याला अपाय होत नाही, त्याचे विचलित (चंचल) मन स्थिर (केन्द्रित) होते, त्याची कान्ती सतेज होते, तो बेसावध (बेशुध्द) न होता मरण पावतो आणि यापेक्षा आणखी अधिक अशी अध्यात्मिक प्रगती जरी तो करू शकला नाही तरी तो सुगती प्राप्त करतो.

भिक्षुंनो, अशा रीतीने चित्ताला विमुक्त करणारी जी मैत्रीभावना (सार्वत्रिक मैत्री) ती अंगी बाणविल्याने , आत्मसात केल्याने, तिचे आचरण केल्याने, तिच्याप्रमाणे वर्तन केल्याने, तिचे अनुसरण केल्याने, तिला मनामध्ये दृढ बनविल्याने, तिच्याशी पुर्णपणे परिचित झाल्याने, त्या मनोभावनेने ओतप्रोत झाल्याने आणि त्या मैत्रीभावनेचा चांगला आरंभ केल्याने, माणसाने त्या मैत्रीभावनेपासून वरील प्रकारच्या फायद्यांची अपेक्षा करावी.

भगवन्तांनी अशा प्रकारचा उपदेश दिला, तो उपदेश ऐकल्यावर भिक्षूंनी संतुष्ट मनाने भगवन्तांची वाहवा केली (अनुमोदन दिले)

## १२ - मित्तानिसंसं सुत्तं

पूरेन्तो बोधिसंभारे, नाथो तेमियजातियं ।
मित्तानिसंस यमाह, सुनन्दं नाम सारथिं ।
सब्बलोकहितत्थाय, परित्तं तं भणामहे ।।
पहूत भक्खो भवति विप्पमुतो सका घरा ।
बहू नं उपजीवन्ति यो मित्तानं न दूभति ।।१ ।।

यं यं जनपदं याति, निगमे राजधानियो ।
सब्बत्थ पूजितो होति, यो मित्तानं न दूभति ।।२ ।।

नास्स चोरा पसहन्ति, नातिमञ्ञेति खत्तियो ।
सब्बे अमित्ते तरति, यो मित्तानं न दूभति ।।३ ।।

---

### १२. मैत्रीचे फायदे (सांगणारे सूत्र)

बोधिज्ञान प्राप्त करण्यासाठी लागणाऱ्या आवश्यक गुणांची परिपूर्ती करीत असता भगवान बुध्द 'तेमिय' बोधिसत्वाच्या स्वरूपात जन्मले होते तेव्हा त्यांनी सुनन्द नावाच्या सारथ्याला सार्वत्रिक मैत्रीपासून होणाऱ्या फायद्यांविषयी जो उपदेश केला, त्या रक्षणमंत्राचे पाठ आम्ही अखिल जगताच्या हितासाठी व फायद्यासाठी करीत आहोत.

१) जो मनुष्य मित्रांचा द्रोह करीत नाही, तो आपल्या घरापासून दूरच्या जागी (गावी) असला तरी त्याला भरपूर जेवणखाण प्राप्त होते व इतर पुष्कळ माणसे त्याच्या आधारावर जगतात.

२) जो मनुष्य मित्रांचा द्रोह (त्याग करीत नाही, तो ज्या ज्या देशात, नगरीत किंवा राजधानीत जातो तेथे पूजिला जातो (त्याचा आदरसत्कार होतो)

३) जो मनुष्य मित्रांचा विश्वासघात करीत नाही. त्याच्यावर जोर जुलूम जबरदस्ती करीत नाही, राजा त्याचा अपमान करीत नाही व तो सर्व शत्रूंवर जय प्राप्त करतो.

**अक्कुद्धो सघरं एति, सभाय पटिनन्दितो ।**
**ञातीनं उत्तमो होति, यो मित्तानं न दूभति ।।४।।**
**सक्कत्वा सक्कतो होति, गरू होति सगारवो ।**
**वण्णकित्तिभतो होति, यो मित्तानं न दूभति ।।५।।**
**पूजको लभते पूजं, वन्दको पटिवन्दनं ।**
**यसो कित्तिञ्च पप्पोति, यो मित्तानं न दूभति ।।६।।**
**अग्गि यथा पज्जलति, देवताव विरोचति,**
**सिरिया अजहितो होती, यो मित्तानं न दूभति ।।७।।**
**गावो तस्स पजायन्ति, खेत्ते वुत्तं विरूहति ।**
**पुत्तानं फलमस्नाति, यो मित्तानं न दूभति ।।८।।**

---

४) जो मनुष्य आपल्या मित्रांचा द्रोह करीत नाही तो सभासंमेलनांमध्ये आनंदित होऊन, रागावल्याशिवाय (शांतपणे) घरी येतो व स्वतःच्या नातलगांमध्ये श्रेष्ठत्व प्राप्त करतो.

५) जो मनुष्य मित्रांना फसवत नाही (त्यांचा द्रोह करीत नाही) तो दुसऱ्या लोकांचा आदर करून स्वतः आदर (मानसन्मान) प्राप्त करतो, दुसऱ्या माणसांना मोठेपणा देऊन स्वतः मोठेपणा प्रान्त करतो आणि स्वतः यश व किर्ती संपादन करतो.

६) जो मनुष्य आपल्या मित्रांचा द्रोह करीत नाही, तो दुसऱ्या माणसांची पुजा करून स्वतः पूजिला जातो, दुसऱ्या माणसांना वंदन करून दुसऱ्यांकडून वन्दिला जातो व प्रशंसा आणि किर्ती प्राप्त करतो.

७) जो मनुष्य मित्रांचा द्रोह करीत नाही. तो मनुष्य ज्याप्रमाणे अग्नी प्रकाशित होतो व देवतांचे तेज सर्वत्र पसरते त्याप्रमाणे त्या माणसाची संपत्ति त्याला सोडून जात नाही.

८) जो मनुष्य मित्रद्रोह करीत नाही, त्या माणासच्या गुरांची संख्या वाढत जाते, त्याच्या शेतात जे पेरले असेल ते उगवते व जे काही त्याने पेरले असेल त्याचे फळ प्राप्त होते.

दरितो पब्बतातो वा रूक्खातो पतितो नरो ।
चुतो पतिट्ठं लभति, यो मित्तानं न दूभति ।।९।।

विरूल्हमूल सन्तानं, निग्रोधमिव मालुतो ।
अमित्ता नप्पसहन्ति, यो मित्तानं न दूभति ।।१०।।

## १३ - मोर परित्तं

पूरेन्तो बोधिसम्भारे, निब्बत्तो मोरयोनियं ।
येन संविहितारक्खं, महासत्तं वनेचरा ।।
चिरस्सं वायमन्तापि, ने सक्खिंसु गण्हितुं ।
ब्रह्ममन्तंति अक्खातं, परित्तं तं भणामहे ।।

---

९) जो मनुष्य मित्रांचा द्रोह करीत नाही, तो मनुष्य पर्वतावरून दरीत किंवा वृक्षावरून खाली पडल्यावर त्याला आधार प्राप्त होतो.

१०) ज्याप्रमाणे वारा खोलवर मुळे पसरलेल्या वटवृक्षाला विचलित करू शकत नाही त्याप्रमाणे जो मनुष्य मित्रद्रोह करीत नाही, त्याच्यावर त्याचे शत्रू अरेरवी करू शकत नाही.

### १३. मोर परित्राण

बोधिज्ञानाच्या (बुध्दत्वाच्या) प्राप्तीसाठी बोधिसत्व (भावी बुध्द) विविध सद्‌गुणांमध्ये पूर्णत्व प्राप्त करण्यासाठी, निरनिराळ्या जन्मात प्रयत्न करीत असता एकदा मोराच्या योनीत असता, ज्या संरक्षणमंत्राच्या कारणाने त्याच्या संरक्षणाची व्यवस्था झाल्यामुळे वनचर त्याला (मोराला) पुष्कळ वेळा प्रयत्न करूनही पकडू शकले नाहीत. व ज्या संरक्षणमंत्राला ब्रह्ममंत्र म्हणण्यात येते, त्या संरक्षणमंत्राचे (सुरक्षास्तोत्राचे) आम्ही पठन करीत आहोत.

**उदेतयं चक्खुमा एकराजा,**
**हरिस्सवण्णो पठविप्पभासो ।**
**तं तं नमस्सामि, हरिस्सवण्णं**
**पठविप्पभासं, तयज्ज गुत्ता**
**विहरेमु दिवसं ।।१ ।।**

**ये ब्राह्मणा वेदगु सब्बधम्मे,**
**ते मे नमो, ते च मं पालयन्तु ।**
**नमत्थु बुध्दानं, नमत्थु बोधिया,**
**नमो विमुत्तानं, नमो विमुत्तिया ।**
**इमं सो परित्तं कत्वा,**
**मोरो चरति एसना ।।२ ।।**

---

१) चक्षुमान, सुवर्णवर्णी, पृथ्वीवर प्रकाश पसरविणारा हा एकमेव सूर्यराजा उदय पावत आहे. पृथ्वीला प्रकाशित करणाऱ्या सुवर्णवर्णी सूर्याला मी नमस्कार करीत आहे. त्याच्याकडून रक्षण मिळाल्यामुळेच आम्ही आजपर्यंत जिवंत आहोत.

२) सर्व धर्मांचे ज्ञान धारण करणाऱ्या या सर्व सद्पुरूषांना माझा नममस्कार, ते माझे रक्षण करोत ! बुध्दांना माझे नमन असो ! विमुक्त साधूंना माझा नमस्कार असो । विमुक्तीला माझे नमन हो । अशा प्रकारे आपल्या संरक्षणाची व्यवस्था करून मोर आपले अन्नपाणी शोधण्यासाठी हिंडत असे.

**अपेतयं चक्खुमा एकराजा,**
**हरिस्सवण्णो पठविप्पभासो ।**
**तं तं नमिस्सामि हसिस्वण्णं**
**पठविप्पभासंतयज्ज गुत्ता**
**विहरेमु रत्तिं ।।३।।**

**ये ब्राह्मणा वेदगु सब्बधम्मे,**
**ते मे नमो ते च मं पालयन्तु ।**
**नमत्थु बुध्दानं नमत्थु बोधिया**
**नमो विमुत्तानं, नमो विमुत्तिया ।**
**इमं सो परित्तं कत्वा**
**मोरो वासमकप्पयीति ।।४।।**

---

३) चक्षुमान, सुवर्णवर्णी, पृथ्वीवर प्रकाश पसरविणारा हा एकमेव सूर्यराजा अस्त पावला आहे. पृथ्वाला प्रकाशित करणाऱ्या सुवर्णवर्णी सूर्याला मी नमस्कार करीत आहे. त्याच्याकडून रक्षण मिळाल्यामुळेच आम्ही आजपर्यंत जिवंत आहोत.

४) सर्व धर्मांचे ज्ञान धारण करणाऱ्या या सर्व सद्पुरूषांना माझा नमस्कार. ते ब्राह्मण माझे रक्षण करोत ! बुध्दांना माझा नमस्कार असो ! (त्यांच्या) बोधिला माझा नमस्कार असो ! विमुक्त साधूंना माझा नमस्कार असो ! त्यांच्या विमुक्तीला माझा नमस्कार असो ! आपल्या संरक्षणाची अशा प्रकारे व्यवस्था करून तो मोर तेथे निवास करीत असे.

# १४ - चन्द परित्तं

राहुना गहितो चन्दो, मुत्तो यस्सानुभावतो ।
सब्बवेरीभयं नासं, परित्तं तं भणामहे ।।

एवं मे सुतं, एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । तेन खो पन समयेन, चन्दिमा देवपुत्तो राहुना असुरिन्देन गहितो होति । अथ खो चन्दिमा देवपुत्तो भगवन्तं अनुस्सरमानो, तायं वेलायं इमं गाथं अभासिः-

नमो ते बुध्दवीरत्थु, विप्पमुत्तोसि सब्बधी ।
सम्बाध पटिपन्नोस्मि, तस्स मे सरणं भवाति ।।

---

## १४. चंद्र परित्राण

ज्या रक्षणमंत्राच्या प्रभावामुळे राहूच्या बन्धनातून (ग्रहणातून) चंद्र मुक्त झाला व जो रक्षणमंत्र सर्व शत्रूंच्या भयाचा नाश करतो, त्या रक्षणमंत्राचे (सुरक्षापाठाचे) आम्ही पठन करीत आहोत.

मी असे ऐकले आहे की, एकदा भगवान बुध्द श्रावस्ती नगरातील जेतवनात अनथपिण्डिकाच्या आरामात (वनोद्यानात) राहात होते. त्या समयी श्रेष्ठपुत्र चंद्राला राहू नावाच्या एका असुरांच्या राजाने बन्धनात ठेवले होते. तेव्हा देवपुत्र चंद्राने भगवान बुध्दांचे स्मरण करीत हा श्लोक उच्चारला :-

हे बुध्दविरा, तुला वंदन असो ! तू सर्व बन्धनातून मुक्त झालेला आहेस. मी येथे संकटात सापडलो आहे. तू माझे रक्षण कर (मला आश्रय प्रदान कर)

**अथ खो भगवा चन्दिमं देवपुत्तं आरब्भ राहुं असुरिन्दं गाथाय अज्झभासि :-**

**तथागतं अरहन्तं चन्दिमा सरणं गतो ।**
**राहू चन्दं पमुञ्चस्सु, बुध्दा लोकानुकम्पकाति ।।**

**अथ खो राहु असुरिन्दो चन्दिमं देवपुत्तं, मुञ्चित्वा तरमानरूपो येन वेपचित्ति असुरिन्दो, तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा संविग्गो लोमहट्ठजातो, एकमन्तं अट्ठासि । एकमन्तं ठितं खो राहुं असुरिन्दं वेपचित्ति असुरिन्दो गाथाय अज्झभासि :-**

**किन्नुसन्तरमानोव, राहु चन्दं पमुञ्चसि ।**
**संविग्गरूपो आगम्म, किन्नुभीतोव तिट्ठसीति ।।**

---

(ते ऐकून) भगवन्तांनी असुरांचा राजा जो राहू त्याला उद्देशून पुढील श्लोक म्हटला :-

अर्हत्, तथागत, बुध्दामध्ये देवपुत्र चंद्राने आश्रय घेतलेला आहे. राहू, तू चंद्र देवपुत्राला मुक्त कर, कारण बुध्द सर्व लोकांबद्दल मनात अनुकंपा (दया) बाळगत असतात.

तदनंतर असुरांचा राजा जो राहू त्याने देवपुत्र चंद्राला मुक्त केले व तो घाईघाईने वेपचित्ति नावाच्या दुसऱ्या एका असुरांच्या राजाकडे गेला व तेथे भयभीत व त्रस्त स्थितीत (अवस्थेत) एका बाजूला उभा राहिला. एका बाजूला उभा राहिलेल्या असुरराजा राहूला उद्देशून वेपचित्ति असुरराजाने पुढील श्लोक म्हटला :-

तू इतक्या घाईने चंद्राला बन्धनातून का मुक्त केलेस आणि भयभीत व त्रस्त अवस्थेत येथे येऊन का उभा राहिला आहेस ?

सत्तधा मे फले मुध्दा जीवन्तो न सुखं लभे ।
बुध्द गाथाभिगीतोम्हि नो चे मुञ्चेय्य चन्दिमन्ति ।।

## १५ - सुरिय परित्तं

सुरियो राहुग्गहितो मुत्तो यस्सानुभावतो ।
सब्बवेरीभयं नासं, परित्तं तं भणामहे ।।

**एवं मे सुत्तं, एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । तेन खो पन समयेन सुरियो देवपुत्तो राहुना असरिन्देन गहितो होति अथ खो सुरियो देवपुत्तो भगवन्तं अनुस्सरमानो तायं वेलायं इमं गाथं अभासि :-**

---

(राहू-), मी चंद्राला बन्धनातून मुक्त केले नसते तर माझ्या मस्तकाची सात शकले झाली असती व मला जन्मभर सुख लाभले नसते, कारण की भगवान बुध्दाने मला तसे करण्यास सुचविले (सांगितले) होते.

### १५. सूर्य परित्राण

ज्या रक्षणमंत्राच्या प्रभावामुळे राहूच्या बन्धनातून सूर्य मुक्त झाला व जो रक्षणमंत्र सर्व शत्रूंच्या भयाचा नाश करतो, त्या रक्षणमंत्राचे (रक्षणपाठाचे) आम्ही पठन करीत आहोत.

मी असे ऐकले आहे की, एकदा भगवान बुध्द श्रावस्ती नगरात जेतवनात अनाथपिण्डिकाच्या आरामात (वनोद्यानात) राहात होते. त्या समयी देवपुत्र सूर्याला राहू नावाच्या एका असुरराजाने बन्धनात ठेवले होते. तेव्हा देवपुत्र सूर्याने भगवान बुध्दाचे स्मरण करीत पुढील श्लोक म्हटला :-

**नमो ते बुध्दविरत्थु विप्पमुतोसि सब्बधी ।**
**सम्बाध पटिपन्नोस्मि, तस्स मे सरणं भवाति ।।१ ।।**

**अथ खो भगवा सुरियं देवपुत्तं आरब्भ राहुं**
**असुरन्दिं गाथाहि अज्झभासि :-**
**तथागतं अरहन्तं सुरियो सरणं गतो ।**
**राहु सुरियं पमुञ्चस्सु बुध्दा लोकानुकम्पकाति ।।२ ।।**

**यो अन्धकारे तमसी पभंकरो**
**वेरोचनो मण्डली उग्गतेजो ।**
**मा राहु गिली चरं अन्तलिक्खे,**
**पजं मम, राहु, पमुञ्च सुरियन्ति ।।३ ।।**

---

हे बुध्दवीरा, तुला नमस्कार असो ! तू सर्व बन्धनातून मुक्त झालेला आहेस. मी येथे संकटात सापडलो आहे. तू मला आश्रय (रक्षण) दे.

ते ऐकून भगवन्तानी असुरराजा राहुला उद्देशून, देवपुत्र सूर्याविषयी पुढील श्लोक म्हटला:-

अर्हत् तथागत बुध्दामध्ये (देवपुत्र) सूर्याने आश्रय घेतलेला आहे. राहू, तू सूर्य (देवपुत्रा) ला मुक्त कर कारण भगवान बुध्द सर्व जगाबद्दल मनात अनुकम्पा (दया) बाळगत असतात.

जो दाट अंधकारात पूर्ण स्वरूपात उग्र तेजासह तळपत प्रकाश पसरवित असतो त्या सूर्याला, हे राहू, तू आकाशात, तो फिरत असता (भ्रमण करीत असता), गिळू नकोस, तो माझा प्रजाजन आहे. तू त्या सूर्याला मुक्त कर.

अथ खो राहु असुरिन्दो सुरियं देवपुत्तं मुञ्चित्वा तरमानरूपो येन वेपचित्ति असुरिन्दो तेनुपसङ्कामि, उपसङ्कामित्वा संविग्गो लोमहट्ठजातो एकमन्तं अट्ठासि । एकमन्तं ठितं खो राहुं असुरिन्दो वेपचित्ती अूसुरिन्दो गाथाय अज्झभासि :-

किन्नु सन्तरमानोव राहु सुरियं पमुञ्चसि,

संविग्गरूपो आगम्म, किन्नु भीतो' व तिट्ठसीति ।।४।।

''सत्तधा मे फले मुध्दा, जीवन्तो, न सुखं लभे

बुध्दगाथाभिगीतोम्हि, नो चे मुञ्चेय्य सूरियन्ति ।।५।।

---

तदनंतर असुरराज राहूने देवपुत्र सूर्याला मुक्त केले व तो घाईघाईने वेपचित्ति नावाच्या दुसऱ्या एका असुरराजाकडे केला व तेथे भयभयीत त्रस्त मनःस्थितीत एका बाजुला उभा राहिला. एका बाजुला उभा राहिलेल्या असुरराज राहूला उद्देशून वेपचित्ति असुरराजाने पुढील श्लोक म्हटला :-

''राहू, तू इतक्या घाईने सूर्याला बन्धनातून का मुक्त केलेस ? आणि नंतर भयभीत आणि त्रस्त मनःस्थितीत येथे येऊन का उभा राहिला आहेस ?''

(राहू) - मी जर सूर्याला बन्धनातून मुक्त केले नसते तर माझ्या मस्तकाची सात शकले झाली असती व मला जन्मभर सुख लाभले नसते, कारण की भगवान बुध्दाने मला तसे करण्यास सुचविले (सांगितले) होते.''

# १६ - धजग्ग परित्तं

यस्सानुस्सरणेनापि, अन्तलिक्खेपि पाणिनो ।
पतिट्ठं अधिगच्छन्ति, भूमियं विय सब्बथा ।
सब्बूपद्दवजालम्हा यक्खचोरारिसंभवा ।
गणना न च मुत्तानं, परित्तं तं भणामहे ।।

**एवं मे सुत्तं, एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । तत्र खो भगवा भिक्खू आमन्तेसि भिक्खवोति भदन्तेति ते भिक्खू भगवतो पच्चस्सोसुं, भगवा एतदवोच :-**

---

## १६ - ध्वजाग्र परित्राण

ज्या रक्षणमंत्राच्या केवळ स्मरणाने, प्राण्यांना अन्तरिक्षात (आकाशात), जमिनीवर (भूमीवर) सुध्दा ज्या सर्व प्रकारांनी आधार प्राप्त होतो त्या प्रमाणे त्यांना आधार प्राप्त होतो, आणि ज्याच्या प्रभावामुळे यक्ष, चोर व शत्रु यांच्यापासून उत्पन्न झालेल्या सर्व प्रकारच्या उपद्रवांच्या जाळ्यातून मुक्त झालेल्या माणसांची गणना पण करता येत नाही, त्या रक्षणमंत्राचे (सुरक्षा स्त्रोताचे) आम्ही पठन करतो.

मी असे ऐकले आहे की, एकदा भगवान बुध्द श्रावस्ती नगरात जेतवनातील अनाथपिण्डिकाच्या आरामात (वनोद्यानात )राहात होते. तेथे भगवन्तांनी भिक्षूंना म्हटले - '' भिक्षुंनो !'' ते ऐकून भिक्षूंनी प्रतिसाद दिला ''काय भगवान ?'' त्यावर भगवान म्हणाले.

**भूतपुब्बं भिक्खवे, देवासुरसङ्गामो सूमपब्बुल्हो अहोसि। अथ खो भिक्खवे सक्को देवानमिन्दो देवे तावतिंसे आमन्तेसि, सचे मारिसा देवानं सङ्गामगतानं उप्पज्जेय्य भयं वा छम्भितत्तंवा लोमहंसो वा, ममेव तस्मिं समये धजग्गं उल्लोकेय्याथ। ममं हि भो धजगग्गं उल्लोकयतं, यं भविस्सति भयं वा छम्भितत्तं वा लोमहंसो वा, सो पहीयिस्सति ।**

**नो चे मे धजग्गं उल्लोकेय्याथ, अथ पजापतिस्स देवराजस्स धजग्गं उल्लोकेय्याथ । पजापतिस्स हि वो देवराजस्स धजग्गं उल्लोकयतं, यं भविस्सति भयं वा छम्भिततं वा लोमहंसो वा सो पहीयिस्सति।**

**नो चे पजापतिस्स देवराजस्स धजग्गं उल्लोकेय्याथ, अथ वरूणस्स देवराजस्स धजग्गं उल्लोकय्याथ, वरूणस्स हि वो देवराजस्स धजग्गं उल्लोकयतं, यं भविस्सति भयं वा छम्भितत्तं वा लोमहंसो वा सो पहीयिस्सति ।**

---

भिक्षुंनो, पुर्वी एकदा देवासुरसंग्राम चालू होता तेव्हा देवांचा राजा तो इन्द्र त्याने तावतिंस स्वर्गातील देवांना म्हटले- मित्रांनो, जर युध्दभूमीवर गेलेल्या देवांच्या मनात भय, आतंक किंवा रोमहर्ष उत्पन्न झाले तर त्यावेळी तुम्ही माझ्या ध्वजाग्राकडे पहावे. तुम्ही माझ्या ध्वजाग्राकडे पाहिल्यास तुमच्या मनात जे काही भय किंवा आतंक किंवा रोमहर्ष (थरकाप) असेल, ते नाहीसे (दूर) होईल.

तुम्ही माझ्या ध्वजाग्राकडे न पाहिल्यास, देवराज प्रजापतीच्या ध्वजाग्राकडे पहा. तुम्ही देवराज प्रजापतीच्या ध्वजाग्राकडे पाहिल्यास तुमच्या मनामध्ये जे काही भय किंवा थरकाप असेल, ते नाहीसे होईल.

तुम्ही देवराज प्रजापतिच्या ध्वजाग्राकडे न पाहिल्यास, देवराज वरूणाच्या ध्वजाग्राकडे पहा. तुम्ही देवराज वरूणाच्या ध्वजाकडे पाहिल्यास, तुमच्या मनामध्ये जे काही भय किंवा थरकाप असेल, ते नाहीसे होईल.

**नो चे वरूणस्स देवराजस्स धजग्गं उल्लोकेय्याथ, अथ इसानस्स देवराजस्स धजग्गं उल्लोकेय्याथ । ईसानस्स हि वो देवराजस्स धजग्गं उल्लोकयतं, यं भविस्सति भयं वा छम्भितत्तं वा लोमहंसो वा सो पहीयिस्सति ।**

**तं खो पन भिक्खवे, सक्कस्सवा देवानमिन्दस्स धजग्गं उल्लोकयतं, वरूणस्स वा देवराजस्स धजग्गं उल्लोकयतं, इसानस्स वा देवराजस्स धजग्गं उल्लोकयतं यं भविस्सति भयं वा छम्भितत्तं वा लोमहंसो वा सो पहीयेथापि नोपि पहीयेथ। तं किस्स हेतु ? सक्को भिक्खवे देवानमिन्दो अवीतरागो, अवीतदोसो, अवीतमोहो, भीरुच्छम्भी, उत्रासि, पलायीति ।**

---

तुम्ही देवराज वरूणाच्या ध्वजाग्रहाकडे न पाहिल्यास, देवराज ईशान्याच्या ध्वजाग्रहाकडे पहा. तुम्ही देवराज ईशान्याच्या ध्वजाग्राकडे पाहिल्यास, तुमच्या मनामध्ये जे काही भय किंवा आतंक किंवा थरकाप असेल, ते नाहिसे होईल.

भिक्षुंनो, शुक्र, प्रजापती, वरूण व ईशान्य यांच्या ध्वजाग्राकडे तुम्ही पाहिल्यास, तुमच्या मनातील भय किंवा आतंक किंवा थरकाप असेल, ते नाहीसे होईल किंवा होणार पण नाही. त्याचे काय कारण असेल ? भिक्षुंनो, देवांचा राजा जो इन्द्र त्याने वासना, द्वेष व लोभ त्यांचा त्याग केलेला नाही. तो भित्रा, घाबरलेला (भयग्रस्त), संत्रस्त, व पळपुटा आहे.

**अहञ्च भिक्खवे, एवं वदामि :- सचे तुम्हाकं भिक्खवे, अरञ्ञगतानं वा रूक्खमूलगतानं वा सुञ्ञागारगतानं वा उप्पज्जेय्य भयं वा छम्भितत्तं वा लोमहंसो वा ममेव तस्मिं समये अनुस्सरेय्याथ :-**

**इतिपि सो भगवा अरहं सम्मासम्बुध्दो विज्जाचरणसम्पन्नो सुगतो लोकविदू अनुत्तरो पुरिसदम्मसारथी सत्था देवमनुस्सानं बुध्दो भगवाति । ममं हि वो भिक्खवे अनुस्सरतं, यं भविस्सति भयं वा छम्भितत्तं वा लोमहंसो वा, सो पहीयिस्सति ।**

**नो चे मं अनुस्सरेय्याथ । अथ धम्मं अनुस्सरेय्याथ :- 'स्वाक्खातो भगवता धम्मो, सन्दिट्ठिको, अकालिको, एहिपस्सिको, ओपनयिको पच्चत्तं वेदितब्बो विञ्ञूहीति । धम्मं हि वो भिक्खवे अनुस्सरतं, यं भविस्सति भयं वा छम्भितत्तं वा लोमहंसो वा, सो पहीयिस्सति ।**

---

भिक्षुंनो, तुम्हाला असे सांगतो की जर भिक्षुंनो, तुम्ही अरण्यात गेल्यावर, किंवा एकाकी (एकान्त) जागी बसलेले असता तुमच्या मनात भय, संत्रास (आतंक) किंवा थरकाप उत्पन्न झाल्यास, त्यासमयी तुम्ही पुढीलप्रमाणे माझे स्मरण करावे -

'भगवान बुध्द, अर्हत, सम्यकसम्बुध्द, विद्या व आचारसम्पन्न, सुगत, सर्व लोकांचे (जगतांचे) ज्ञाते, संयमाच्या मार्गावर मानवांचा सर्वश्रेष्ठ सारथी, देवमनुष्यांचा शास्ता, असा संबोधिप्राप्त बुध्द आहे' भिक्षुंनो अशा रीतीने माझे स्मरण केल्यास तुमच्या मनात जे काही भय किंवा संत्रास किंवा थरकाप असेल, ते नाहीसे होईल.

तुम्ही माझे स्मरण न केल्यास माझ्या धम्माचे अशा रीतीने स्मरण करा - भगवन्तांनी धम्माचा उपदेश चांगल्या रीतीने केला आहे. तो या जगात दिसणारा (दृष्य स्वरूपात) आहे. प्रत्यक्ष अनुभवण्यासारखा आहे, तात्काळ फळ देणारा आहे, निर्वाणगामी आहे व विद्वान पुरूषांना आकलन होण्यासारखा आहे. भिक्षुंनो, तुम्ही माझ्या धम्माचे स्मरण केल्यास तुमच्या मनात जे काही भय, संत्रास किंवा थरकाप असेल, तो दूर होईल.

**नोचे धम्मं अनुस्सरेय्याथ अथ सङ्घं अनुस्सरेय्याथः- 'सुपटिपन्नो भगवतो सावकसङ्घो, उजुपटिपन्नो भगवतो सावकसङ्घो, ञायपटिपन्नो भगवतो सावकसङ्घो, सामीचिपटिपन्नो भगवतो सावकसङ्घो, यदिदं चत्तारि पुरिसयुगानि, अट्ठपुरसिपुग्गला, एस भगवतो सावकसङ्घो, आहुनेय्यो, पाहुनेय्यो, दक्खिणेय्यो अञ्जलिकरणियो, अनुत्तरं पुञ्ञक्खेतं लोकस्साति । सङ्घंहि वो, भिक्खवे अनुस्सरतं, यं भविस्सति भयं वा छम्भितत्तं वा लोमहंसो वा सो पहीयिस्सति।**

**तं किस्स हेतु ?**

**तथागतो भिक्खवे अरहं सम्मासम्बुध्दो वीतरागो वीतदोसो वीतमोहो अभीरू, अच्छम्भी अनुत्रासि, अपलायीति।**

**इतमवोच भगवा, इदं वत्वा सुगतो अथापरं एतदवोच सत्थाः-**

---

जर तुम्ही धर्माचे स्मरण नाही केले तर भिक्षुसंघाचे अशा रीतीने स्मरण करा - भगवन्तांच्या शिष्यांचा (भिक्षूंचा) संघ सरळ मार्ग आक्रमित आहे, तो सन्मार्ग (न्यायमार्ग) आक्रमित आहे, तो उचित मार्ग आहे. त्या संघात चार (प्रकारच्या) भिक्षूंच्या जोड्या आहेत व आठ (प्रकारचे) भिक्षू आपहेत. भगवन्तांचा हा भिक्षुसंघ आदरतिथ्य करण्यासारखा, पाहुणचार करण्यासाठी, दान देण्यास योग्य (सुपात्र) व वन्दनीय आहे व सर्व (जगासाठी) पुण्य प्राप्त करण्यासाठी उत्तम क्षेत्र आहे' भिक्षुंनो, भिक्षुसंघाचे स्मरण केल्याने तुमच्या मनात जे काही भय, संत्रास किंवा थरकाप असेल, तो नाहीसा होईल.''

त्याचे कारम काय बरे असावे ?

भिक्षुंनो, तथागत अर्हत सम्यकबुध्दाने वासना, द्वेप व अज्ञान (मोह) यांचा त्याग केला आहे. तो भित्रा, घाबरलेला (भयग्रस्त), संत्रस्त व पळपुटा नाही.

भगवान बुध्द असे म्हणाले. सुगताने हे म्हणून पुन्हा शास्ता असे म्हणाले -

अरञ्ञे रुक्खमूले वा सुञ्ञागारेव भिक्खवो,
अनुस्सरेथ सम्बुध्दं, भयं तुम्हाकं नो सिया ।।१।।

नो चे बुध्दं सरेय्याथ, लोकजेट्ठं नरासभं ।
अथ धम्मं सरेय्याथ, नीयानिकं सुदेसितं ।।२।।

नो चे धम्मं सरेय्याथ, नीयानिकं सुदेसितं ।
अथ सङ्घं सरेय्याथ, पुञ्ञक्खेत्तं अनुत्तरं ।।३।।

एवं बुध्दं सरन्तानं, धम्मं सङ्घंच भिक्खवो,
भयं वा छम्भितत्तं वा, लोमहंसो न हेस्सतीति ।।४।।

पठमक भाणवारं निट्ठितं ।

---

भिक्षुंनो, तुम्ही अरण्यात, वृक्षमुळापाशी किंवा एकान्त जागी सम्बुध्दाचे स्मरण केल्यास तुम्ही निर्भय (भयमुक्त) व्हाल.

जर तुम्ही लोकज्येष्ठ नृपतीबुध्दाचे स्मरण केले नाही, तर चांगल्या रीतीने उपदेशिलेल्या निर्वाणगामी धर्माचे स्मरण करा.

जर तुम्ही चांगल्या रीतीने उपदेशिलेल्या निर्वाणगामी धर्माचे स्मरण केले नाही तर सर्वोत्तम पुण्यक्षेत्र असा जो भिक्षुसंघ त्याचे स्मरण करा.

भिक्षुंनो, अशा रीतीने तुम्ही बुध्द, धर्म व भिक्षुसंघ यांचे स्मरण केले असता तुमच्या मनातील भय, आतंक (संत्रास) व थरकाप नाहीसे होतील.

**प्रथम भाणवार समाप्त**

## १७ - महाकस्सपत्थेरबोज्झंगं

यं महाकस्सपत्थेरो, परित्तं मुनिसन्तिका ।
सुत्वा तस्मिं खणे येव, अहोसि निरूपद्दवो ।
बोज्झङ्गबलसंयुत्तं, परित्तं तं भणामहे ।।

एवं मे सुतं, एकं समयं भगवा राजगहे विहरति वेलुवने कलन्दकनिवापे । तेन खो पन समयेन आयस्मा महाकस्सपो पिप्फलीगुहायं विहरति आबाधिको दुक्खितो बाल्हगिलानो। अथ खो भगवा सायन्हसमयं पितसल्लाना वुट्ठितो, येनायस्मा महाकस्सपो तेनुपसङ्कमित्वा पञ्ञत्ते आसने निसीदि । निसज्ज खो भगवा आयस्मन्तं महाकस्सपं एतदवोच - कच्चि ? ते कस्सप, खमनीयं, कच्चि ? यापनीयं ? कच्चि ? दुक्खा वेदना पटिक्कमन्ति नो अभिक्कमन्ति, पटिक्कमोसानं पञ्ञायति नो अभिक्कमोति

---

### १७ - महाकस्सपत्थेरबोध्यंग

जो रक्षणमंत्र बुध्दमुनीच्या तोंडून ऐकताक्षणीच महाकाश्यप स्थविर उपद्रवरहित झाला, त्या बोधिज्ञानाच्या अंगांनी (विविध घटकांनी) युक्त अशा रक्षणमंत्राचे (सुरक्षा स्तोत्राचे) आम्ही पठन करीत आहोत.

मी असे ऐकले आहे की, एकदा भगवान बुध्द राजगृहात वेळुवनात कलन्दकनिवापात (खारींना चारा घालण्याच्या जागी) राहात होते. त्यावेळी आयुष्यमान महाकाश्यप पिफ्फलित गुहेत राहात होता व रोगग्रस्त, व्याधिग्रस्त व पीडित अवस्थेत होता. तेव्हा एक दिवस सायंकाळी भगवान स्थितीतून उठून आयुष्यमान् महाकाश्यपाकडे गेले व तेथे पोहोचल्यावर तेथील आसनावर बसले. तेथे बसल्यानंतर भगवन्तांनी आयुष्यमान महाकाश्यपाला म्हटले, काश्यप, तुझी प्रकृती बरी आहे ना ? तुझी पीडा कमी होत आहे ना ? तुझे बरे चालले आहे ना ? जास्त वाढत तर नाही ना ? व्याधीची तीव्रता कमी वाटते आहे ना ? की तीव्रता जास्त वाटते आहे ?

**न मे भन्ते खमनियं, न यापनीयं, बाल्हा मे दुक्खा वेदना, अभिक्कमन्ति नो पटिक्कमन्ति, अभिक्कमोसानं पञ्ञायति नो पटिक्कमोति ।**

**सत्तिमे कस्सप ! बोज्झङ्गा मया सम्मदक्खाता भाविता बुहलीकता अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तन्ति, कतमे सत्त ?**

**सति सम्बोज्झङ्गो खो कस्सप मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बानाय संवत्तति।**

**धम्मविचय सम्बोज्झङ्गो खो कस्सप ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

---

भगवान, माझी प्रकृती बरी नाही. माझे स्वास्थ ठीक नाही. मला तीव्र वेदना होत आहेत. वेदना वाढतच आहेत, कमी होत नाहीत. व्याधीची तीव्रता वाढत आहे. कमी होत नाही.

काश्यप, मी हे सात बोध्यंगे (बोधिज्ञानाची अंगे) समजावून सांगितली आहेत की ज्यांची भावना केल्याने (मनात बाणविल्याने) व त्यांच्या आचारणात आणल्याने, अभिज्ञा (परमज्ञान) सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते. कोणते सात बोध्यंगे ?

स्मृती बोध्यंग, काश्यप, जे मी चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याच्या अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

धर्मविचय बोध्यंग, काश्यप जे मी चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान) सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

विरिय सम्बोज्झङ्गो खो कस्सप : मयासम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।

पीति सम्बोज्झङ्गो खो कस्सप ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।

पस्सध्दि सम्बोज्झङ्गो खो कस्सप ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।

---

वीर्य बोध्यांग, काश्यप, जे मी चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

प्रीती बोध्यंग, काश्यप, जे मी चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

प्रश्नब्धि बोध्यंग, काश्यप, जे मी चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

**समाधि सम्बोज्झङ्गो खो कस्सप ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

**उपेक्खा सम्बोज्झङ्गो खो कस्सप ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

**इमे खो कस्सप ! सत्त बोज्झङ्गा मया सम्मदक्खाता भाविता बहुलीकता अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तन्तिति ।**

**तग्घ भगव ! बोज्झङ्गा तग्घ सुगत ! बोज्झङ्गाती ।**

---

समाधी बोध्यंग, काश्यप, जे मी चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते आणि उपेक्षा बोध्यंग, काश्यप, जे मी चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

काश्यप, मी हे जे सात सम्बोध्यंगे चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहेत. त्यांना मनात नीट बाणविल्यास व त्यांना आचरणात आणल्यास (त्यांचा अभ्यास केल्यास) ते अभिज्ञा, संबोधी व निर्वाणाची प्राप्ती करून देतात. ''तर भगवान, हीच बोध्यंगे आहेत, तर, सुगत हीच बोध्यंगे आहेत.''

इदमवो च भगवा । अत्तमनो आयस्मा महाकस्सपो भगवतो भासितं अभिनन्दि ।

उट्ठाहि चायस्मा महाकस्सपो तम्हा आबाधा । तथा पहीनो चायस्मतो महाकस्सपस्स सो आबाधो अहोसीति ।

## १८ - महामोग्गल्लानत्थेरबोज्झङ्गं

मोगल्लानोपि थेरो यं, परित्तं मुनिसन्तिका ।
सुत्वा तस्मिं खणे येव, अहोसि निरूपद्दवो ।
बोज्झङ्गबलसंयुक्तं, परित्तं तं भणामहे ।।

---

भगवान, बुध्दाने अशी शिकवणूक दिली व सन्तुष्ट होऊन महाकाश्यपाने भगवन्तांच्या भाषणाचे अनुमोदन केले.

आयुष्यमान् महाकाश्यप त्या आजारातून उठला. अशा रितीने आयुष्यमान महाकाश्यप त्या व्याधीतून मुक्त झाला.

### १८ - महामोग्गल्लानत्थेरबोध्यंग

मौद्गल्यायनस्थविर (मोग्गल्लानथेर) भगवान बुध्दापाशी जे परित्राण (परित्त-रक्षणमंत्र) ऐकल्यावर त्याक्षणी उपद्रवरहित (उपद्रवांपासून मुक्त) झाला, त्या बोध्यांगाच्या बलांनी युक्त, अशा रक्षणमंत्रांचे पठन (संगायन) आम्ही करीत आहोत.

**एवं मे सुत्तं, एकं समयं भगवा राजगहे विहरति वेलुवने कलन्दक निवापे । तेन खो पन समयेन आयस्मा महामोग्गल्लानो गिज्झकूटे पब्बते विहरति आबाधिको दुक्खितो बाल्हगिलानो अथ खो भगवा सायन्हसमयं पतिसल्लाना वुट्ठितो येनायस्मा महामोग्गल्लानो तेनुपसङ्कमि । उपसङ्कमित्वा पञ्ञत्ते आसने निसीदि । निसज्ज खो भगवा आयस्मन्तं महामोग्गल्लानं एतदवोच :- कच्चि ? ते मोग्गल्लान ! खमनीयं ? कच्चि ! यापनीयं, कच्चि ? दुक्खा वेदना पटिक्कमन्ति नो अभिक्कमन्ति, पटिक्कमोसानं पञ्ञायति नो अभिक्कमोति ।**

**न मे भन्ते खमनीयं, न यापनीयं, बाल्हा मे दुक्खा वेदना अभिक्कमन्ति नो पटिक्कमन्ति अभिक्कमोसानं पञ्ञायति, नो पटिक्कमोति ।**

---

मी असे ऐकले आहे की, एके समयी भगवान बुध्द राजगृहात वेळूवनात कलन्दकनिवापाच्या स्थानी विहार करीत होते. त्या समयी आयुष्यमान महामोग्गल्लान गृधकूट पर्वतावर राहत होता. त्यावेळी तो गंभीर आजाराने रोगग्रस्त, व्याधीग्रस्त व पीडाग्रस्त (व्यथित) होता. त्यावेळी भगवान बुध्द सायंकाळी ध्यानसाधनेतून उठल्यावर आयुष्यमान महामोग्गलानाकडे गेले व तेथे पोहोचल्यावर तेथील एका आसनावर बसले. तेथे बसल्यानंतर भगवान आयुष्यमान (आदरणीय) महामोग्गल्लानास उद्देशून म्हणाले :- मोग्गल्लान, तुझी प्रकृती कशी काय आहे ? तुला आता बरे वाटत आहे ना? तुझ्या वेदना (दुःख पीडा) कमी होत आहेत ना ? तुझ्या वेदना वाढत तर नाहीत ना ? रोगाचा (व्याधीचा) जोर वाढतो तर नाही ना ? (रोगाची पिछेहाट होत आहे ना?) रोगाची (व्याधीची) आगेकूच तर होत नाही ना ?

''भगवान, माझी पकृती बरी नाही. मला मुळीच बरे वाटत नाही. माझ्या वेदना कमी न होता उलट वाढतच आहेत. माझ्या रोगाचा जोर पिछेहाट न करता आगेकूच करीत आहे. असे दिसते.

**''सत्तिमे मोग्गल्लान बोज्झङ्गा मया सम्मदक्खाता भाविता बहुलीकता अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तन्ति कतमे सत्त ?**

**सतिसम्बोज्झङ्गो खो मोग्गल्लान ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति।**

**धम्मविचयसम्बोज्झङ्गो खो मोगल्लान ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

**विरिय सम्बोज्झङ्गो खो मोग्गल्लान ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति।**

---

''मोग्गल्लान, मी ही सात बोध्यंगे (बोधज्ञानाची अंगे) समजावून सांगितली आहेत, की ज्यांची भावना केल्याने (मनात बाणविल्याने) व त्यांचा अभ्यास केल्यास (त्यांना आचरणात आणल्याने) अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते. कोणते सात बोध्यंगे?

स्मृती बोध्यंग, मोग्गल्लान, जे मी चांगल्या रितीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

धर्मविचय बोध्यंग, मोग्गल्लान, जे मी चांगल्या रितीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

वीर्य बोध्यंग, मोग्गल्लान, जे मी चांगल्या रितीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

**पीतिसम्बज्झङ्गो खो मोग्गल्लान ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

**पस्सध्दिसम्बोज्झङ्गो खो मोग्गलान ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

**समाधिसम्बोज्झङ्गो खो मोग्गल्लान ! मया समदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

**उपेक्खासम्बोज्झङ्गो खो मोग्गल्लान ! मया सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

---

प्रीती बोध्यंग, मोग्गल्लान, जे मी चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

प्रश्नाब्धि बोध्यंग, मोग्गल्लान, जे मी चांगल्या रितीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान) सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

समाधी बोध्यंग, मोग्गल्लान, जे मी चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान) सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते आणि

अपेक्षा बोध्यंग मोग्गल्लान जे मी चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने), अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

**इमे खो मोग्गल्लान ! सत्त बोज्झङ्गा मया सम्मदक्खाता भाविता बहुलीकता अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तन्तिति ।**

**तग्घ भगव ! बोज्झङ्गा, तग्घ सुगत ! बोज्झङ्गाति ।**

**इदमवोच भगवा अत्तमनो आयस्मा महामोग्गल्लानो भगवतो भासितं अभिनन्दि ।**

**वुट्ठाहि चायस्मा माहमोग्गल्लानो तम्हा आबाधा । तथा पहीनो चायस्मतो महामोग्गल्लानस्स सो आबाधो अहोसीति।**

---

मोग्ग्ल्लान, मी हे जे सात बोध्यंगे चांगल्या रितीने समजावून सांगितले आहेत. त्यांना मनात नीट बाणविल्यास (त्यांना आचरणात आणल्यास) व त्यांचा अभ्यास केल्यास ते अभिज्ञा, सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती करून देतात.

''भगवान, बोध्यंगे म्हणून ज्यांचे वर्णन करतात, ती हीच तर सुगत, बोध्यंगे म्हणून ज्यानचे वर्णन करतात ती हीच तर !''

भगवना बुध्दाने वरीलप्रमाणे उपदेश दिला. आयुष्यमान मोगल्लान मनात प्रसन्न होऊन भगवन्तांच्या भाषणाचे (उपदेशाचे) अनुमोदन केले.

आयुष्यमान महामोग्गल्लान (त्या उपदेशामुळे) त्या रोगातून (व्याधीतून) मुक्त झाला. अशा प्रकारे आयुष्यमान् महामोग्गल्लानाचा तो रोग बरा झाला.

# १९ - महाचुन्दत्थेरबोज्झङ्गं

भगवा लोकनाथो यं, चुन्दत्थेरस्स सन्तिका ।
सुत्वा तस्मिं खणे येव, अहोसि निरूपद्दवो ।
बोज्झङ्गबलसंयुत्तं, परित्तं तं भणामहे ।।

एवं मे सुतं, एकं समयं भगवा राजगहे विहरति वेलुवने कलन्दकनिवापे । तेन खो पन समयेन भगवा आबाधिको होति दुक्खितो बाल्हगिलानो । अथ खो आयस्मा महाचुन्दो सायन्हसमयं पतिसल्लाना वुट्ठितो येन भगवा तेनुपसङ्कमि । उपसङ्कमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं निसीदि । एकमन्तं निसिन्नं खो आयस्मन्तं महाचुन्दं भगवा एतदवोचः- पटिभन्तु तं चुन्द, बोज्झङ्गाति ।

---

## १९ - महाचुन्दत्थेरबोध्यंग

लोकनाथ भगवान बुध्द चुन्दस्थविरापाशी जे परित्राण (परित्त रक्षणमंत्र) ऐकल्यावर तत्क्षणी उपद्रवरहित झाले, त्या बोध्यांगांच्या बलाने युक्त अशा रक्षणमंत्राचे (परित्ताचे) आम्ही पठन (संगायन) करीत आहोत.

मी असे ऐकले आहे की एके समयी भगवान बुध्द राजगृहात, वेळूवनात कलन्दकनिवापाच्या ? (खारींना दाणापाणी देण्याच्या) स्थानी राहत असत. त्या समयी भगवान बुध्द गंभीर आजाराने रोगग्रस्त, व्याधीग्रस्त व पीडाग्रस्त (व्यथित) होते. त्या वेळी आयुष्यमान् (आदरणीय) महाचुन्द सायंकाळी ध्यानसाधनेतून उठल्यावर भगवान बुध्दाकडे गेला. महाचुन्द तेथे जाऊन (पोहचल्यावर) भगवान बुध्दाला वंदन करून एका बाजूला बसलेल्या आयुष्यमान चुन्दास भगवान म्हणाले, चुन्द, तू बोध्यंगांचे पठन (पारायण) करावेस.

**सत्ति मे भन्ते बोज्झङ्गा भगवता सम्मदक्खाता भाविता बहुलीकता अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तन्ति । कतमे सत्त ?**

**सतिसम्बोज्झङ्गो खो भन्ते । भगवता सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

**धम्मविचयसम्बोज्झङ्गो खो भन्ते ! भगवता सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

**विरियसम्बोज्झङ्गो खो भन्ते ! भगवता सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

---

महाराज, भगवान बुध्दाने ही सात बोध्यंगे, योग्य (चांगल्या) रीतीने उपदेशिलेली आहेत. त्या बोध्यंगाची भावना (मननचिंतन) केल्यास, त्यांना आचरणात आणल्याने, अभिज्ञा (श्रेष्ठ ज्ञान-शक्ती), संबोधी व निर्वाण यांची प्राप्ती होते. कोणती सात बोध्यंगे बरे?

स्मृती बोध्यंग, भगवंताने जे चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना (मनचिंतन) केल्याने (त्याला आचरणात आणल्याने) अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

धर्मविचय, बोध्यंग, भगवंताने जे चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना (मननचिंतन) केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने) अभिज्ञा (परमज्ञान) सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

वीर्य बोध्यंग, भगवंताने जे चांगल्या रीतीने समजावून सांगितले होते. त्याची भावना (मननचिंतन) केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने) अभिज्ञा (परमज्ञान), सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

**पीति सम्बोज्झङ्गो खो भन्ते ! भगवता सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति।**

**पस्सध्दि सम्बोज्झङ्गो खो भन्ते भगवता सम्मदक्खातो भाविता बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

**समाधि सम्बोज्झङ्गो खो भन्ते ! भगवता सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति।**

**उपेक्खा सम्बोज्झङ्गो खो भन्ते ! भगवता सम्मदक्खातो भावितो बहुलीकतो अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

---

प्रीती बोध्यंग, भगवंताने जे चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना (मननचिंतन) केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने) अभिज्ञा (परमज्ञान) सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

प्रश्नाब्धि बोध्यंग, भगवंताने जे चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना (मननचिंतन) केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने) अभिज्ञा (परमज्ञान) सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

समाधी बोध्यंग, भगवंताने जे चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना (मननचिंतन) केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने) अभिज्ञा (परमज्ञान) सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

उपेक्षा बोध्यंग, भगवंताने जे चांगल्या रीतीने समजावून सांगितले आहे. त्याची भावना (मननचिंतन) केल्याने, त्याचा अभ्यास केल्याने (त्याला आचरणात आणल्याने) अभिज्ञा (परमज्ञान) सम्बोधी व निर्वाणाची प्राप्ती होते.

**इमे खो भन्ते ! सत्तबोज्झङ्गा भगवता सम्मदक्खाता भाविता बहुलीकता अभिञ्ञाय सम्बोधाय निब्बाणाय संवत्तति ।**

**तग्घ चुन्द बोज्झङ्गा, तग्घ चुन्द ! बोज्झङ्गाति ।**

**इदमवोच आयस्मा महाचुन्दो समनुञ्ञो सत्था अहोसि ।**

**वुट्ठाहि च भगवा तम्हा आबाधा तथा पहीनो च भगवतो सो आबाधो अहोसीति ।**

# २० - गिरिमानन्द सुत्तं

**थेरो यं गिरीमानन्नदो, आनन्दत्थेरसन्तिका ।**
**सुत्वा तस्मिं खणे येव, अहोसि निरूपद्दवो ।**
**दससञ्ञूपसंयुत्तं परित्तं तं भणामहे ।।**

---

महाराज, भगवान बुध्दाने ही सात बोध्यंगे योग्य (चांगल्या) रीतीने उपदेशिलेली आहेत. त्या बोध्यंगाचा अभ्यास केल्याने, त्याचे मनन चिंतन केल्यास, अभिज्ञा (श्रेष्ठ ज्ञान शक्ती), संबोधी व निर्वाण यांची प्राप्ती होते.

चुन्द, हीच बोध्यंगे आहेत, चुन्द, यांनाच बोध्यंगे म्हणतात.

आयुष्यमान् महाचुन्दाने वरीलप्रमाणे प्रवचन केले व शास्त्याने (बुध्दाने) त्याचे समर्थन केले.

भगवान बुध्द त्यांच्या त्या रोगापासून मुक्त झाले व त्यांचा तो रोग (व्याधी) नाहीसा झाला.

### २० - गिरीमानन्द सूत्र

गिरिमानन्द स्थविराने आनंदस्थविराच्या तोंडून रक्षणमंत्र (परित्त) ऐकल्यावर, तत्क्षणीच तो गिरिमानन्द उपद्रवमुक्त (पीडा व्यथाविरहित) झाला. त्या दहा संज्ञांनी युक्त अशा रक्षणमंत्राचे आम्ही पठन (संगायन) करीत आहोत.

**एवं मे सुतं, एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । तेन खो पन समयेन आयस्मा गिरिममानन्दो आबाधिका होति दुक्खितो बाल्हगिलानो । अथ खो आयस्मा आनन्दो येन भगवा तेनुपसङ्कमि । उपसङ्कमित्वा निसिन्नो खो आयस्मा आनन्दो भगवन्तं एतदवोच :- आयस्मा भन्ते गिरिमानन्दो आबाधिको दुक्खितो बाल्हगिलानो, साधु भन्ते, भगवा येनायस्मा गिरिमानन्दो तेनुपसङ्कमतु अनुकम्पं उपादायाति ।**

**सचे खो त्वं आनन्द, गिरिमानन्दस्स भिक्खुनो उपासङ्कमित्वा, दससञ्ञा भासेय्यासि । ठानं खो पनेतं विज्जति यं गिरिमानन्दस्स भिक्खुना दससञ्ञ सुत्वा सो आबाधो ठानसो पटिप्पस्सम्भेय्य । कतमे दस ?**

---

मी असे ऐकले आहे की, एके समयी भगवान बुध्द श्रावस्तीत जेतवनात अनाथपिण्डिकाच्या उद्यानात निवास करीत असत. त्यासमयी आयुष्यमान (आदरणीय) गिरिमानन्द गंभीर आजाराने (रोगाने) व्यथित (पीडीत) होता. त्या वेळेस आयुष्यमान आनंद भगवान बुध्दाजवळ गेला व तेथे जाऊन भगवन्तांना अभिवादन करून, तो एका बाजूला बसला. एका बाजूला बसल्यावर आयुष्यमान आनंदाने भगवान बुध्दाला उद्देशून म्हटले :- महाराज आयुष्यमान गिरिमानन्द गंभीर रोगाने रोगग्रस्त, व्याधीग्रस्त व पीडाग्रस्त आहे. महाराज, भगवान बुध्द त्याच्यावर दया (अनुकम्पा) करून गिरिमानन्द जेथे निवास करीत आहे, तेथे आले तर फार चांगले होईल.

आनंद, तू गिरिमानन्द भिक्षूजवळ जाऊन जर त्याला दहा संज्ञांचा उपदेश दिलास (दहा संज्ञा समजवल्यास) तर असा संभव आहे की, गिरिमानन्द स्थविराने दहा संज्ञावरील तुझे प्रवचन ऐकल्यावर, त्याचा तो रोग पूर्णपणे निर्मूल (बरा) होईल. त्या दहा संज्ञा कोणकोणत्या?

अनिच्चसञ्ञा, अनत्तसञ्ञा, असुभसञ्ञा, आदीनवसञ्ञा, पहानसञ्ञा, विरागसञ्ञा, निरोधसञ्ञा, सब्बलोके अनभिरतसञ्ञा, सब्बसङ्खारेसु अनिच्चसञ्ञा, आनापानसति।

१) कतमाचानन्द, अनिच्चसञ्ञा ?

इधानन्द, भिक्खु अरञ्ञगतो वा रूक्खमूलगतो वा सुञ्ञागारगतो वा इति - पटिसञ्चिक्खति ! 'रूपं अनिच्चं वेदना अनिच्चा सञ्ञा अनिच्चा सङ्खारा अनिच्चा विञ्ञाणं अनिच्चन्ति। इति इमेसु पञ्चसुपादानक्खन्धेसु अनिच्चानुपस्सी विहरति अयं वुच्चतानन्द, अनिच्चसञ्ञा ।''

---

अनित्यसंज्ञा, अनात्मसंज्ञा, अशुभसंज्ञा, आदीनवसंज्ञा, प्रहाणसंज्ञा, विरागसंज्ञा, निरोधसंज्ञा सर्व जगतासंबंधी अनासक्ति संज्ञा (अनभिरतिसंज्ञा), सर्व सृष्ट व निर्मित वस्तूसंबंधी (संस्कारा संबंधी) अनित्यसंज्ञा व आनापानस्मृती (श्वासोच्छवासासंबंधी जागृतता-सतर्कता)

**१) आनंद, अनित्यसंज्ञा कोणती ?**

''आनंद, एखादा भिक्षू अरण्यात जाऊन वा झाडाच्या मुळापाशी जाऊन वा एकान्तात (शून्यघरात) बसला असता असा विचार करतो :- रूप अनित्य आहे, वेदना अनित्य आहे, संज्ञा अनित्य आहे, सृष्ट व निर्मित वस्तू (सजीव प्राणी-जीवसृष्टी व निर्जीव पदार्थ-संस्कार) अनित्य आहेत व विज्ञान पण अनित्य आहेत. अशा रीतीने तो भिक्षू पाच उपादानस्कन्धांत (जीवनाविषयीच्या अस्तित्वाविषयीच्या आसक्तीमध्ये) अनित्यतेचे दर्शन करतो (त्याला नित्यता दिसत नही). आनंद, याला अनित्यसंज्ञा म्हणतात.

**इतिह तेन खणेन तेन मुहुत्तेन याव ब्रह्मलोका सद्दो अब्भुग्गच्छि। दससहस्सी लोकधातु सङ्कम्पि सम्पकम्पि, सम्पवेधि । अप्पमाणो च उळारो ओभासो लोके पातुरहोसि अतिक्कम्म देवानं देवानुभावन्ति ।**

**अथ खो भगवा उदानं उदानेसि, अञ्ञासि वत भो कोण्डञ्ञो अञ्ञासि वत भो कोण्डञ्ञोति । इतिहिदं आयस्मतो कोण्डञ्ञस्स अञ्ञा कोण्डञ्ञो त्वेव नामं अहोसिति ।**

**एतेन सच्चवज्जेन सोत्थि ते होतु सब्बदा ।**

---

अशा प्रकारे त्याचवेळी आणि त्याच क्षणी हा आवाज ब्रह्म लोकांपर्यंत पोहोचला आणि दहा हजार ब्रह्मांडे डगमगली, कंप पावली, डळमळू लागली, देवतांच्या तेजापेक्षा महान तेजायमान असा विशाल प्रकाश जगात निर्माण झाला.

त्यावेळी भगवंताने उद्‌गार काढले - 'अहा ! कौण्डण्याने जाणले. खरोखर ! कौण्डन्याने जाणले !' या कारणामुळेच आयुष्यमान कौण्डन्याचे नाव 'अज्ञानकौण्डन्य' असे पडले. या सत्यवचनामुळे सर्वत्र नेहमी कल्याण होवो !

# २३ - महासमय सुत्तं

एवं मे सुत्तं, एकं समयं भगवा सक्केसु विहरति कपिलवत्थुस्मिं महावने महता भिक्खुसङ्घेन सध्दिं पञ्चमत्तेही भिक्खुसतेहि सब्बेहेव अरहन्तेहि । दसहि च लोकधातूहि देवता येभुय्येन सन्निपतिता होन्ति भगवन्तं दस्सनाय भिक्खुसङ्घञ्च ।

अथ खो चतुन्नं सुध्दावासकायिकानं देवानं एतदहोसिः अयं खो भगवा सक्केसु विहरति कपिलवत्थुस्मिं महावने महता भिक्खुसङ्घेन सध्दिं पञ्चमत्तेहि भिक्खुसतेहि सब्बेहेव अरहन्तेहि । दसहि च लोकधातूहि देवता येभुय्येन सन्निपतिता होन्ति भगवन्तं दस्सनाय भिक्खुसङ्घञ्च, यन्नून मयम्पि येन भगवा तेनुपसङ्कमेय्याम, उपसङ्कमित्वा भगवतो सन्तिके पच्चेकगाथं भासेय्यामाति ।

---

### २३. महासमय सूत्र

मी ऐकले आहे की, भगवान बुध्द सर्वच अरहन्त असलेल्या पाचशे भिक्षुंच्या मोठ्या संघासह शाक्यांच्या राज्यातील कपिलवस्तू नगरातील महावनामध्ये राहता होते. भगवान बुध्दा आणि त्यांच्या भिक्षुसंघ यांच्या दर्शनासाठी दाही लोकांतून (चक्रवाळातून) बहुतेक सर्व देव तेथे आले होते.

त्या समयी चार सुध्दावासिक देवांच्या मनात असे आले :- 'भगवान बुध्द, सर्वच अरहन्त असलेल्या पाचशे भिक्षूंच्या मोठ्या संघासह, शाक्यांच्या राज्यातील कपिलवस्तू नगरातील महावनामध्ये राहात आहेत. भगवान बुध्द आणि भिक्षुसंघ यांच्या दर्शनासाठी दाही लोकांतून (चक्रवाळातून) बहुतेक सर्व देव तेथे एकत्र झाले आहेत. अशा प्रसंगी जर आपणही भगवन्तांकडे जाऊन आपल्यापैकी प्रत्येकजणाने त्यांच्या पुढे एकएक गाथा म्हणावी.''

**अथ खो ता देवता सेय्यथापि नाम बलवा पुरिसो सम्मिञ्जितं वा बाहं पसारेय्य पसारितं वा बाहं सम्मिञ्जेय्य, एवमेवं सुध्दावासेसु देवेसु अन्तरहिता भगवतो पुरतो पातुरहंसु । अथ खो ता देवता भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं अट्ठंसु, एकमन्तं ठिता खो एका देवता भगवतो सन्तिके इमं गाथं अभासि ।**

**महासमयो पवनस्मिं, देवकाया समागता,**

**आगतम्ह इमं धम्मसमयं दक्खिताये अपराजितसङ्घन्ति।**

**अथ खो अपरा देवता भगवतो सन्तिके इमं गाथं अभासि :-**

**तत्र भिक्खवो समादहंसु चित्तं अत्तनो उजुकमकंसु,**

**सारथीव नेत्तानि गहेत्वा इन्द्रियानि रक्खन्ति पण्डितातिं।**

---

त्यानंतर ते सर्व देव एखादा बलवान माणूस जितक्या सहजपणे आपला आखडलेला हात लांब पसरतो व लांब पसरलेला हात आखुडून घेतो, तितक्याच सहजतेने सुध्दावास देवलोकात (स्वर्गात) अंतर्धान पावून भगवन्तांच्या पुढे येऊन दाखल झाले (हजर झाले) आणि भगवन्तांना वंदन करून ते देव एका बाजूला उभे राहिले. एका बाजूस उभ्या राहिलेल्या एका देवाने भगवन्तांच्या पुढे (सान्निध्यात) पुढील गाथा म्हटली.

या महावनामध्ये मोठा समुह एकत्रित झाला आहे. पुष्कळसे देव एकत्र जमले आहेत. अपराजित भिक्षुसंघाच्या दर्शनासाठी आम्ही या धर्मसंमेलनात आलो आहोत.

नंतर दुसऱ्या एका देवाने भगवन्तांच्या पुढे गाथा म्हटली :- ''येथे भिक्षूंनी आपले मन एकाग्र (केंद्रित) करून आपले मन सरळ (शिस्तबध्द) केले आहे. ज्याप्रमाणे सारथी आपल्या हातात लगाम घेऊन (घोड्याला) आपल्या ताब्यात ठेवतो, त्याप्रमाणे पंडित आपल्या इन्द्रियांना ताब्यात ठेऊन त्यांचे रक्षण करतात.''

अथ खो अपरा देवता भगवतो सन्तिके इमं गाथं अभासि:–

छेत्वा खीलं छेत्वा पलिघं इन्दखीलं ऊहच्चमनेजा, ते चरिन्ति सुद्दा विमला चक्खुमता सुन्दता सुसुनागाति ।

अथ खो अपरा देवता भगवतो सन्तिके इमं गाथं अभासि:–

ये केचि बुध्दं सरणं गतासे न ते गमिस्सन्ति अपायं, पहाय मानुसं देहं देवकायं परिपूरेस्सन्तीति ।

अथ खो भगवा भिक्खू आमन्तेसि :–

ये भुय्येन भिक्खवे दससु लोकधातुसु देवता सन्निपतिता तथागतं दस्सनाय भिक्खुसङ्घञ्च,येपिते. भिक्खवे, अहेसुं अतीतमध्दानं अरहन्तो सम्मासम्बुद्दा तेसम्पि भगवन्तानं एतपरमायेव देवता सन्निपतिता अहेसुं सेय्यथापि मय्हं एतरहि; येपि ते भिक्खवे भविस्सन्ति अनागतम्ध्दानं अरहन्तो सम्मसम्बुध्दा तेसम्पि भगवन्तानं एतपरमायेव देवता सन्निपतिता भविस्सन्ति सेय्यथापि

---

नंतर आणखी एका देवाने भगवन्तांच्या पूढे पूढील गाथा म्हटली :– खिळा (राग) , अडसर (व्देष) व इन्द्रखील (मोह) तोडून हे शुध्द, निरिच्छ, विमल, तरूण हत्ती (भिक्षू) ज्याचे चक्षुमान बुध्दाने दमन केलेल आहे, ते भिक्षू येथे विहार करीत आहेत.

नंतर आणखी एका (चौथ्या )देवाने भगवन्तांच्या पूडे पूडील गाथा म्हटली :– जे कोणी भगवान बुध्दाला शरण गेले असतील , ते हिन गतीस (नरकू, पशू, भूत प्रेत) जाणार नाहीत. ते मानवी देहाचा त्याग करून देवलोकांत प्रवेश करतील.

तदनंतर भगवन्तांनी भिक्षूंना म्हटले :– भिक्षूंनो ,दाही लोकातील (चक्रवाळातील) बहुतेक सर्व देव येथे तथागत बुद्द आणि त्यांचा भिक्षूसंघ यांच्या दर्शनासाठी पुष्कळ वेळा जमतात. भिक्षूंनो, भुतकाळात जे अरहन्त सम्यक होऊन गेले, त्या भगवन्तांच्या वेळी देखील मला आता पाहण्यासाठी जमले आहेत त्याप्रमाणे इतकेच देव त्या समयी (भूतकाळात पण )जमत असत. भविष्यकाळातही मला पाहण्यास जमतील.

मय्हं एतरहि । आचिक्खिस्सामि, भिक्खेवे, देवकायानं नामानि, कित्तयिस्सामि भिक्खवे देवकायनं नामानि, देसिस्सामि भिक्खवे देवकायानं नामानि, तं सुणाथ साधुकं मनसिकरोथ भासिस्सामीति । एवम्भन्तेति खो ते भिक्खू भगवतो पच्चस्सोसुं। भगवा एतदवोच-

सिलोकमनुकस्सामि यत्थ भुम्मा तदस्सिता ।
ये सिता गिरिगब्भारं पहितत्ता समाहिता ।।१।।

पुथुसीहाव सल्लीना लोमहंसाभिसम्भुनो ।
ओदातमनसा सुध्दा विप्पसन्नामनाविला ।।२।।

भिय्यो पञ्चसते ञत्वा वने कापिलवत्थवे ।
ततो आमन्तयी सत्था सावके सासने रते ।।३।।

देवकाया अभिव्कन्ता ते विजानाथ भिक्खवो ।
ते च आतप्पमकरूं सुत्वा बुध्दस्स सासनं ।।४।।

---

एवढेच देव जमतील, भिक्षुंनो, मी तुम्हाला त्या सर्व देवांची नावे सांगतो, मी त्या सर्व देवांचे वर्णन करीन. भिक्षुंनो, त्या देवांच्या नावांचा उपदेश करीन. ते तुम्ही नीट ऐका आणि ध्यानात ठेवा. मी आता बोलतो (माझ्या प्रवचनाचा आरंभ करतो ) ठीक , भगवान, असे म्हणून भिक्षूंनी भगवन्तांना प्रतिसाद दिला. भगवान असे म्हणाले :- भूमीवरील देव कोणकोणत्या ठिकाणी निवास करतात, ते मी तुम्हांला थोडक्यात (संक्षिप्त रूपात) श्लोकात सांगतो :- गिरिकन्दरात राहणारे , निश्चयी, संयमी, सिंहाप्रमाणे दृढ व निर्भय असे पुष्कळ स्वच्छ नमाचे , शुध्द, विप्रसन्न व पवित्र भिक्षू पाचशेपेक्षा मोठ्या संख्येत कपिलवस्तूच्या वनात एकत्र जमलेले जाणून शास्त्याने आपल्या धम्मामध्ये रममाण झालेल्या आपल्या शिष्यांना उद्देशून म्हटले , भिक्षूंनो, हा तेजस्वी देवसमुह पहा. बुध्दाचा धर्मोपदेश ऐकून ते तत्पर झाले. (तांनी तपश्चर्या- ध्यानसाधना केली.)

तेसं पातूरहू ञाणं अमनुस्सानदस्सनं ।
अप्पेके सतमद्दक्खुं सहस्सं अथ सत्ततिं ।।५।।
सतं एके सहस्सानं अमनुस्सानमद्दसुं ।
अप्पेकेनन्तमद्दक्खुं दिसा सब्बा फुटा अहु ।।६।।
तञ्चसब्बं अभिञ्ञाय ववक्खित्वान चक्खुमा ।
ततो आमन्तयी सत्था सावके सासने रते ।।७।।
देवकाया अभिक्कन्ता ते विजानाथ भिक्खवो ।
ये वो हं कित्तयिस्सामि गिराहि अनुपुब्बसो ।।८।।
सत्त सहस्सा यक्खा भुम्मा कापिलवत्थवा ,
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,
मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।९।।
छसहस्सा हेमवता यक्खा नानत्तवण्णिनो ,
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,
मोदमानाअभिक्खामुं भिक्खूनं समितिं वनं ।।१०।।

---

त्यांना अतिमानवींना पाहण्याचे ज्ञान प्राप्त झाले . काहींना शंभर अतिमानवी जीव दिसले . काहींना हजार अतिमानत्त्वी जीव दिसले, काहींना सत्तर हजार , काहींना एक लाख, तर काहींना अनंत अतिमानवी रूपे दिसली की ज्यांच्या उपस्थितीमुळे सर्व दिशा भरून गेल्या होत्या. त्या सर्वांना ओळखून व नीट अवलोकन करून त्यानंतर चक्षुमान सास्त्याने, आपल्या धम्मामध्ये रममाण झालेल्या आपल्या शिष्यांना उद्देशून म्हटले, भिक्षूंनो हा तजस्वी देवांचा समुह पहा. त्यांचे वर्णन मी तुम्हाला शब्दामध्ये अनुक्रमे करून दाखवितो.

पृथ्वीवर कपिलवस्तू नगरात निवास करणारे सात हजार दैवी शक्ती धारण करणारे तेजस्वी सुंदर आणि यशस्वी असे यक्ष या वनामध्ये एकत्र झालेल्या भिक्षूंच्या सम्मेलनात सहर्ष (प्रमुदित मनाने)आले आहेत. नाना वर्णांचे दैवी शक्ती धारण करणारे , तेजस्वी, संदर आणि यशस्वी असे सहा हजार हेमवत यक्ष प्रमुदित मनाने (सहर्ष) वनात एकत्र जमलेल्या भिक्षूंच्या संमेलनात आले आहेत.

सातागिरा तिसहस्सा यक्खा नानत्तवण्णिनो ,
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,
मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।११।।

इच्चेते सोलससहस्सा यक्खा नानत्तविण्णिनो,
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,
मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।१२।।

वेस्सामिता पञ्चसता यक्खा नानत्तवण्णिनो,
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,
मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।१३।।

कुम्भीरो राजगहिको वेपुल्लस्स निवेसनं,
भिय्यो नं सतसहस्सं यक्खानं पयिरुपासति,
कुम्भीरो राजगहिको सोपाग समितिं वनं ।।१४।।

---

नाना वर्णांच्या दैवी शक्तींनी युक्त, तेजस्वी, सुंदर आणि यशस्वी असे तीन हजार सातगिर यक्ष प्रमुदित मनाने वनात एकत्र जमलेल्या भिक्षूंच्या परिषदेत (संमेलनात) हजर (उपस्थित) झाले आहेत. असे ते सोळा हजार शक्तीसम्पन्न ,तेजस्वी, सुंदर व यशस्वी यक्ष प्रमुदित मनाने वनात जमलेल्या भिक्षूंच्या संमेलनात आले आहे.

नानावर्णाचे दैवी शक्ती धारण करणारे तेजस्वी , संदर व यशस्वी असे पाचशे वेस्समित्र (विश्वमित्र पर्वतावरील) यक्ष प्रमुदित मनाने वनात एकत्र जमलेल्या भिक्षूंच्या समागमात (संमेलनात) आले आहेत. वेपुल्ल हे ज्याचे निवासस्थान आहे व एक लाखापेक्षा अधिक यक्ष ज्याची सेवा करतात तो , राजगृहातील कुम्भीर नावा चा यक्ष पण प्रमुदित मनाने वनात एकत्र जमलेल्या भिक्षूंच्या संमेलनात आला आहे.

पुरिमञ्च दिसं राजा धतरट्ठो तं पसासति,
गन्धब्बानं आधिपति महाराजा यसस्सिसो ।।१५ ।।

पुत्तापि तस्स बहवो इन्दनामा महब्बला,
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,
मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।१६।।

दक्खिणञ्च दिसं राजा विरूल्हो तं पसासति,
कुम्भण्डानं आधिपति माहाराजा यसस्सिसो।।१७ ।।

पुत्तापि तस्स बहवो इन्दनामा महाब्बला,
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,
मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।१८ ।।

---

धृतराष्ट्र नावाचा गंर्धवराजा पूर्व दिशेला राज्य करतो. तो यशस्वी महाराजा गंधर्वांच अधिपती आहे. त्याचे इन्द्र नावा चे पुष्कळ बलवान पुत्र आहेत. दैवी शक्तींनी संपन्न, तेजस्वी, सुंदर आणि यशस्वी असे ते प्रमुदित मनाने वनात एकत्र जमलेल्या भिक्षूंच्या सभेत आले आहेत.

विरूध्दक नावाचा गन्धर्वराजा दक्षिण दिशेवर राज्य करीत असतो. तो यशस्वी महाराज कुम्भण्डांचा अधिपती आहे. त्याचे इन्द्र नावाचे पुष्कळ शक्तीशाली पुत्र आहेत. देवी शक्तींनी युक्त, तेजस्वी, सुंदर आणि यशस्वी असे ते प्रमुदित मनाने येथे जमलेल्या भिक्षूंच्या मेळाव्यात आले आहेत.

**पच्छिमञ्च दिसं राजा विरूपक्खो तं पसासति,**
**नागानं आधिपति माहारजा यसस्सि सो ।।१९।।**

**पुत्तापि तस्स बहवो इन्दनामा महब्बला,**
**इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यससिसिनो,**
**मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।२० ।।**

**उत्तरञ्च दिसं राजा कुवेरो तं पसासति,**
**यक्खानं आधिपति महाराजा यसस्सि सो ।।२१ ।।**

**पुत्तापि तस्स बहवो इन्दनामा महब्बला,**
**इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,**
**मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।२२ ।**

---

पश्चिम दिशेवर विरूपक्ष नावाचा गर्धवराजा राज्य करीत असतो. तो यशस्वी महाराज नागांचा अधिपती आहे. त्याचे इन्द्र नावाचे पुष्कळ बलवान पुत्र आहेत. देवी शक्तींनी युक्त , तेजस्वी, सुंदर आणि यशस्वी असे ते प्रमुदित मनाने येथे वनात जमलेल्या भिक्षूंच्या संमेलनात आले आहेत.

कुबेर (वेस्सवण ) नावाचा महाराज उत्तर दिशेवर कराज्य करतो. तो यशस्वी महाराजा यक्षांचा अधिपती आहे. त्याचे इन्द्र नावाचे पुष्कळ पुत्र आहेत. दैवी शक्तींनी युक्त, तेजस्वी, सुंदर आणि यशस्वी असे ते प्रमुदित मनाने वनात एकत्र जमलेल्या भिक्षूंच्या समागमात आले आहेत.

**पुरत्तिमेन धतरट्ठो दक्खिणेन विरूल्हको ।**
**पच्छिमेन विरूपक्खो कुवेरो उत्तरं दिसं ।।२३।।**

**चत्तारो ते महाराजा समन्ता चतुरो दिसा,**
**दद्दल्हमाना अट्ठंसु वने कापिलवत्थवे ।।२४।।**

**तेसं मायाविनो दासा आगु वञ्चनिका सठा,**
**माया कुटेण्डु वेटेण्डु विटुच्च विटुडो सह ।।२५।।**

**चन्दनो कामसेट्ठो च किन्नुघण्डु निघण्डुच,**
**पनादो ओपमञ्ञो च देवसूतो च मातली ।।२६।।**

**चित्तसेनो च गन्धब्बो नलोराजा जनेसभो,**
**आगु पञ्चसिखो चेव तिम्बरू सुरियवच्चसा ।।२७।।**

**एते चञ्ञे च राजानो गन्धब्बा सह राजुभि,**
**मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।२८।।**

---

पूर्वदिशेस धृतराष्ट्र, दक्षिणेस विरूव्हल, पश्चिमेस विरूपक्ष व उत्तर दिशेस कुबेर (वैश्रवण) हे चार महाराजे चारी दिशा दिपवून टाकीत कपिलवस्तूतील वनात उभे राहिले आहेत.

त्यांचे मायावी, शठ, वंचनिक (लबाड) दासही आले आहेत. माया, कुटेण्ड, वेटेणडु (वेण्डु) विटुच्च, विटुड, चंदन, कामसेट्ठ, किंनिघण्डु, निघण्डु, पनाद, ओपमञ्ञ, देवांचा सूत मातली. चित्रसेन गन्धर्र, नळराजा, जनर्षभ, पंचसीख, तिम्बरू, सुरियवच्चसा हे आले आहेत. हे व आणखी राजे व राजासहित गंर्धव आनंदित मनाने वनात एकत्र जमलेल्या भिक्षूंच्या सम्मेलनात आले आहेत.

**अथागु नाभसा नागा वेसाला सह तच्छका ,**
**कम्बलस्सतरा आगु पायागा सह ञातिभि ।।२९ ।।**
**यामुना धतरट्ठा आगु नागा यसस्सिनो,**
**एरावणो महानागो सो पा ग समितिं वनं ।।३० ।।**
**ये नागराजे सहसा हरन्ति दिब्बा दिजा पक्खि विसुध्दचक्खू ।**
**वेहासया ते वनमज्झपत्ता चित्रा सुपण्णा इति तेसं नामानि ।।३१ ।।**
**अभयं तदा नागराजानमासि सुपण्णतो खेममकासि बुध्दो,**
**सण्हाहि वाचाहि उपव्हयन्ता नागा सुपण्णा सरणमगंसु बुध्दं ।।३२ ।।**
**जिता वजिरहत्थेन समुद्दं असुरा सिता,**
**भातरो वासवस्सेते इध्दिमन्तो यसस्सिनो ।।३३ ।।**
**कालकञ्जा महाभिंसा असुरा दानवेघसा,**
**वेपचित्ति सुचिती च पहारादो नमुची सह ।।३४ ।।**
**सतञ्च बलिपुत्तानं सब्बे वेरोचनामका,**
**सन्नय्हित्वा बलिं सेनं राहुभद्दमुपागमुं,**
**समयोदानि भद्दन्ते भिक्खूनं समितिं वनं ।।३५ ।।**

---

या शिवाय वेसाल व नभस येथील नाग व तच्छकासह , पयाग येथील कम्बल व अस्सतर नाग आपल्या नातलगासह . यामुन व धतरट्ठ येथील यशस्वी नागरी व एरावण महानाग, हे वनातील भिक्षूंच्या परिषदेत आले आहेत.

जे नागराजांना एकाएकी (जबरदस्तीने) पकडतात असे दिव्य , विशुध्दचक्षू पक्षयुक्त व्दिज (पक्षी), आकाशातून वनामध्ये येऊन पोहचले आहेत. चित्र सपुर्ण असे त्यांचे नाव तेव्हा नागराजांना अभय प्राप्त झाले. बुध्दाने सुपार्णापासून त्यांना भयमुक्त केले आहे. मधुर शब्दांनी एकमेकांना बोलावीत , नाग, सुपर्ण बुध्दास शरण आले आहेत.

वज्रहस्त इन्द्राने जिंकलेले असुर समुद्रात आश्रय घेऊन बसले आहेत. ते वारवाचे (इन्द्राचे) दैवी शक्ती धारण करणारे व यशस्वी असे दोन (सावत्र )भाऊ (आसुरकन्येचे पुत्र)भयानक कालकंज व दांवेघस राक्षस , वेपचिति, सुचित्ति, पहाराद व नमुचिसह वेरोच नावाचे शंभर बलिपुत्र, बलीची सेना शस्त्रासह तयार करून राहुभद्राकडे गेले. (तो म्हणाला), तुमचे भले होवो, वनातील भिक्षूंच्या संमेलनात जाण्याची ही योग्य वेळ आहे.

आपो च देवा पठवी तेजो वायो तदागमुं,
वरूणा वारूणा देवा सोमोच यससा सह ।।३६।।
मेत्ता करूणा कायिका आगु देवा यसस्सिनो,
दसेते दसधा काया सब्बे नानत्तवण्णिनो ।।३७।।
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,
मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।३८।।
वेण्हू च देवा सहली च असमा च दुवे यमा,
चन्दस्सूपनिसा देवा चन्द मागु पुरक्खत्वा ।।३९।।
सुरियस्सुपनिसा देवा सुरिय मागु पुरक्खत्वा,
नक्खत्तानि पुरक्खत्वा आगु मन्दवलाहका ।।४०।।
वसूनं वासवो सेट्ठो सक्कोपाग पुरिन्ददो,
दसेते दसधा काया सब्बे नानत्तवण्णिनो ।।४१।।
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो ।
मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।४२।।

---

आप, पृथ्वी, तेज, व वायू यामधीब देव, वरुण, वारुण , सोम व यस, मत्ताकायिक, करुणकायिक यसस्वी देव आले आहेत. ते दहा दहा समुदाय करुन, नाना वर्णाचे, बुद्धिमान, तेजस्वी (द्युतिमान ), वर्णवाण (सुंदर) व यशस्वी से देव प्रमुदित मनाने वनातील भिक्षूंच्या संमेलनात आले आहेत.

वणहू (वैष्णव) देव, सहली व असम देर यम, चंद्राचे अनुचर देव चन्द्राला पुढे करुन (त्याच्या मागोमाग) आले आहेत. सूर्याचे अनुचर देव सूर्याला पुढे करुन (त्याच्या मागोमाग) आले आहेत. मन्दवलाह (ढग) नक्षत्रास पुढे करुन आले आहेत. वसूंचा श्रेष्ठ वासव (इन्द्र), पुरिन्दद-शक्र हाही आला आहे. हे दहा मनात प्रमुदित होउन वनातील भिक्षूंच्या समागमात आले आहेत.

**अथागु सहभू देवा जलमग्गिसिखारिव, अरिट्ठुका च रोजा च**
**उम्मापुप्फनिभासिनो ।।४३ ।।**
**वरुणा सहधम्मा च अच्चुता च अनेजका,**
**सूलेय्य रूचिरा आगु आगु वासवनेसिनो ।।४४ ।।**
**दसेते दसधा काया सब्बे नानत्तवण्णिनो,**
**इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,**
**मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।४५ ।।**
**समाना महासमाना मानुसा मानुसुत्तमा,**
**खिड्डापदूसिका आगु आगु मनोपदूसिका ।।४६ ।।**
**अथागु हरयो देवा ये च लोहितवासिनो,**
**पारगा महापारगा आगु देवा यसस्सिनो ।। ४७ ।।**
**दसेते दसधा काया सब्बे नानत्तवण्णिनो,**
**इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,**
**मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।४८ ।।**

---

आणि आग्निशिखेप्रमाणे तळपणारे सहभू देवही आले आहेत. अरिट्ठ, रोज , उम्मापुष्पाप्रमाणे (दामुकपुष्पाप्रमाणे)शोभणारे , वरूण, सहधम्म , अच्चुत व अनेजक, सुलेय्य व रूचिर पण आले आहेत. तसेच वासवनेसी पण आले आहेत. ते दहा दहा समुदाय करून ,नाना वर्णाचे, दैवी शक्तींनी युक्त, तेजस्वी, सुंदर व यशस्वी देव प्रमुदित मनाने वनातील भिक्षूंच्या सम्मेलनात आले आहेत.

समान. महासमान, मानुस, मानुसुत्तम, खिड्डापदूसिका देव पण आले आहेत. तसेच हरिदेव व रोहितवासी पण आले आहेत. पराग व माहापराग हे यशस्वी देव आले आहेत. ते दहा (प्रकारे देव) दहा समुदाय करून नाना वर्णाचे, दैवी शक्तींनी युक्त, सुंदर आणि यशस्वी देव प्रमुदित मनाने वनातील भिक्षूंच्या समागमात आले आहेत.

सुक्का करुम्हा अरूणा आगु वेघनसा सह,
ओदातगय्हा पामोक्खा आगु देवा विचाक्खणा ।।४९।।

सदामत्ता हारगजा मिस्सका च यसस्सिनो,
थनयं आगु पज्जुन्नो यो दिसा अभिवस्सति ।।५० ।।

दसेते दसधा काया सब्बे नानत्तवण्णिनो,
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,
मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।५१ ।।

खेमिया तुसिता यामा कट्टका च यसस्सिनो,
लम्बीतका लामसेट्टा जोतिनामा च आसवा ।।५२ ।।

निम्मानरतिनो आगु अथागु परनिम्मिता,
दसेते दसधा काया सब्बे नानत्तवण्णिनो,
इध्दिमन्तो जुतीमन्तो वण्णवन्तो यसस्सिनो,
मोदमाना अभिक्कामुं भिक्खूनं समितिं वनं ।।५४

---

सुक्का, करूम्ह , अरूण, वेघनसासहित देव पण आले आहेत. श्रेष्ठ, ओदातगय्ह व विचक्षण देव पण आले आहेत. सदामत्त, हारगज व मिस्सक हे यशस्वी देव आले आहेत. सर्व दिशांना गर्जना करून पाऊस पाडणारा पर्जन्यदेव पण आला आहे. हे दहा प्रकारचे देव दहा समुदाय करून, नाना वर्णाचे .तेजस्वी, सुंदर व यशस्वी असे देव मनात प्रमुदित होऊन वनातील भिक्षूंच्या समागमात आले आहेत.

खेमिया , तुसति. याम, यशस्वी कट्टक, लम्बित, लामसेट्ट, जोतिनाम व आसव, त्याचप्रमाणे निम्मनरती व परिनिम्मित हे दहा प्रकारचे देव दहा समुदाय करून, नाना वर्णाचे , दैवी शक्तींनी युक्त, तेजस्वी, सुंदर आणि यशस्वी असे देव मनात आनंदित होऊन वनातील भिक्षूंच्या समागमात आले.

सट्ठेते देवनिकाया सब्बे नानत्तवण्णिनो,
नामन्वयेन आगञ्छुं ये चञ्ञे सदिसा सह ।।५५।।

पवुत्थजातिं अखिलं ओघतिण्णमनासवं,
दक्खेमोघतरं नागं चन्दंव असितातिगं ।।५६।।

सुब्रह्मा परमत्तो च पुत्ता इध्दिमतो सह,
सनंकुमारो तिस्सो च सोपाग सिमितिं वनं ।।५७।।

सहस्सबह्मलोकानं महाब्रह्माभितिट्ठति,
उपपन्नो जुतीम्नतो भिस्माकायो यसस्सि सो ।।५८।।

दसेत्थ इस्सरा आगु पच्चेकवसवत्तिनो ।
तेसञ्च मज्झतो आगु हारितो पारिवारितो ।।५९।।

---

ज्याने अनेक जन्म अनुभवले आहेत, जो ओघतीर्ण आणि अनास्त्रव (दुष्षवृत्तीहीन) आहे व जो ओघ (तृष्णेचा) तरून गेलेला नाग (बुध्द) आहे,जो निष्पाप आहे ,त्या अंदकाराचा (अज्ञानाचा) नाश करणाऱ्या चन्द्राप्रमाणे असणाऱ्या नागाला (बुध्दाला) पाहण्यासाठी, म्हणुन हे नाना वर्णांचे साठ देवसमुह आपल्यासारख्या दुसऱ्या देवांसह आपपल्या नावाने आले आहेत.

सुब्रह्म व परमत्त दैवी शक्तींनी युक्त अशा सनंकुमार व तिस्स (बह्मा) पुत्रासहित पण वनातील भिक्षूंच्या समागमात आला आहे. सहस्त्र बह्मलोकांचा अधिपती महाब्रह्मा, जे तेजस्वी, भीष्मकाय, (भयानक काया असणारा) व यशस्वी रूपाचा आहे, तो (महाब्रह्मा) येथे हजर (उपस्थित) आहे. येथे स्वयंवश (स्वतंत्र) अशा दहाईश्वरांच्या समवेत हारीत देव पण येथे आला आहे.

**ते च सब्बे अभिक्कन्ते सइन्दे देवे सब्रह्मके,**
**मारसेना अभिक्कामुं पस्स कण्हस्स मन्दियं ।।६०।।**
**एथ गण्हथ बन्धथ रागेन बध्दमत्थु वे,**
**समन्ता परिवारेथ मा वो मुञ्चित्थ कोचिनं ।।६१।।**
**इति तत्थ महासेनो कण्हसेनं अपेसयी,**
**पाणिना तलमाहच्च सरं कत्वान भेरवं ।।६२।।**
**यथा पावुस्सको मेघो थनयन्तो सविज्जुको,**
**तदा सो पच्चुदावत्ति संकुध्दो असयंवसी ।।६३।।**
**तञ्च सब्बं अभिञ्ञाय ववक्खित्वान चक्खुमा,**
**ततो आमन्तयी सत्था सावके सासने रते ।।६४।।**
**मारसेना अभिक्कन्ता ते विजानाथ भिक्खवो,**
**ते च आतप्पमकरूं सुत्वा बुध्दस्स सासनं,**
**वीतरागेहि पक्कामुं नेसं लोमम्पि इञ्जयुं ।।६५।।**
**सब्बे विजितसङ्गामा भयातीता यसस्सिनो,**
**मोदन्ति सह भूतेहि सावका ते जनेसुताति ।।६६।।**

---

त्या सर्व दिप्तिमान इन्द्र आणि ब्रह्मा यांच्या समूहात असलेल्या देवतांकडे माराची सेना आली आहे. कण्हाच्या (माराच्या) बुध्दीची मंदता पाहा ! तो (मार) ओरडला, इकडे या, यांना बांधा. हे सर्व देव वासनेने बध्द होवोत (वासनेच्या बंधनात सापडोत) ! त्यांना चारी बाजूंनी घेरा. एकालाही सोडू नका ! अशी आज्ञा करून मोठी सेना असलेल्या माराने आपली सेना त्या देवतांवर सोडली आणि त्याच वेळी जमिनीवर हात आपटून भयंकर आवाज केला. ज्याप्रमाणे पाऊस पडणारा मेघ विजेचा लखलखाट होत असतांना गडगडतो, त्याप्रमाणे मार (अयशस्वी झाल्याने) क्रुध्द व बेभान (हतवीर्य) होऊन तेथून परतला.

ते सर्व पाहून व नीट जाणून चक्षुमान बुध्द, त्यांच्या धम्मामध्ये रस असलेल्या आपल्या श्रावकांना (भिक्षूंना) म्हणाले, 'भिक्षूंनो, मारसेना येथे येत आहे, ते जाणा (लक्षात ठेवा) बुध्दाचे शासन (धम्म) ऐकून ते प्रयत्नशील झाले. नंतर त्या विरक्त भिक्षूंपासून ती मारेसना दूर निघून गेली व त्यांच्या केसालाही धक्का लागला नाही. विजितसंग्राम, भयातीत, यशस्वी व लोकांमध्ये सुप्रसिध्द असे ते सर्व श्रावक (भिक्षू) सर्व प्राणिमात्रांसह आनंदित झाले.'

# २४ - आलवक सुत्तं

एवं मे सुतं, एकं समयं भगवा आलवियं विहरति आलवकस्स यक्खस्स भवने । अथ खो आलवको यक्खो येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवन्तं एतदवोच, निक्खम, समणाति । साधावुसोति भगवा निक्खमि, पविस समणाति । साधावुसोति भगवा पाविसी । दुतियम्पि खो आलवको यक्खो भगवन्तं एतदवोच, निक्खम, समणाति । शाधावुसोति भगवा निक्खमि। पविस समणाति साधावुसोति भगवा पाविसी । ततियम्पि खो आलवको यक्खो भगवन्तं एतदवोच, निक्खम, समणाति साधावुसोति भगवा निक्खमि । पविस समणाति । साधावुसोति भगवा पाविसि ।

---

## २४. आलवकसूत्र

मी असे ऐकले आहे की, एके समयी भगवान बुध्द आळवीत आळवक नावाच्या यक्षाच्या भवनात राहात होते. त्यावेळी एक दिवस आळवक यक्ष भगवान जेथे होते, तेथे गेला आणि तेथे जाऊन तो भगवन्तास म्हणाला, हे श्रमण, येथून चालता हो. ठिक आहे, बन्धो, असे म्हणून भगवान आत गेले. (पुन्हा एकदा) दुसऱ्यांदा आळवक यक्षाने भगवन्तास म्हटले, श्रमणा, येथून बाहेर नीघ. ठीक आहे, बन्धो, असे म्हणून भगवान बाहेर निघून गेले. तदनंतर (पुन्हा एकदा) तिसऱ्यांदा आळवक यक्षाने भगवन्तास म्हटले, श्रमणा, येथून निघून जा. ठीक आहे. बन्धो, असे म्हणून भगवान (यक्षभवनाच्या) बाहेर निघून गेले. श्रमणा, आत ये. ठीक आहे, बन्धो असे म्हणून भगवान यक्षभवनाच्या आत आले.

**चतुत्थम्पि खो आलवको यक्खो भगवन्तं एतदवोच, निक्खम, समणाति । नखवाहं आवुसो निक्खमिस्सामि, यं ते करणीयं तं करोहीति । पञ्हं तं समण पुच्छिस्सामि सचे मे न व्याकरिस्ससि, चित्तं वा ते खिपिस्सामि, हदयं वा ते फालेस्सामि, पादेसु वा गहेत्वा पारङ्गायं खिपिस्सामीति ।**

**नखवाहन्तं, आवुसो पस्सामि सदेवके लोके समारके सब्रह्मके सस्समणब्राह्मणिया पजाय सदेवमनुस्साय यो मे चित्तं वा खिप्पेय्य, हदयं वा फालेय्य, पादेसु वा गहेत्वा पारगङ्गायं खिपेय्य, अपि च त्वं आवुसो पुच्छ यदाकङ्खसीती।**

---

त्यानंतर चौथ्यांदा आळवक यक्षाने भगवन्तास म्हटले, श्रमणा, येथून चालता हो. (त्यावर भगवान उत्तरले) बन्धो, आता मी बाहेर जाणार नाही, तुला जे करायचे ते तू कर, श्रमणा, मी तुला (काही) प्रश्न विचारीन. जर तू मला त्यांची (समाधानकारक) उत्तरे दिली नाहीस, तर मी तूझा चित्तक्षेप करीन (तुला वेडा करीन) किंवा तुझे हृदय विदीर्ण करीन (फाडून टाकीन) किंवा तुझे पाय पकडून तुला गंगा नदीच्या पैलतीरावर फेकून देईन.

बन्धो (मित्रा), या देवक, मारक, ब्रह्मक लोकासहीत श्रमणब्राह्मणांमध्ये किंवा देव व मुष्यामध्ये मला असा कोणी प्राणी दिसत नाही, जो माझे चित्त विक्षिप्त (वेडे) करू शकेल किंवा माझे हृदय फाडू शकेल किंवा माझे पाय पकडून, मला गंगेच्या पैलतीरावर फेकून देऊन शकेल. असे असतांनाही बन्धो, तुला जे काही प्रश्न विचारायचे असतील, ते तू विचार.

**अथ खो आलवको यक्खो भगवन्तं गाथाय अज्झभासि**

**किंसूध वित्तं पुरिसस्स सेट्ठं किंसू सुचिण्णो सुखमावहाति**
**किंसू हवे साधुतरं रसानं कथं जीविं जीवितमाहु सेट्ठुन्ति ।।१।।**

**सध्दीध वित्तं पुरिसस्स सेट्ठुं धम्मो सुचिण्णो सुखमावहाति,**
**सच्चं हवे साधुतरं रसानं, पञ्ञाजीविं जीवितमाहु सेट्ठुन्ति**
**।।२।।**

**कथंसु तरती ओघं कथंसु तरति अण्णवं,**
**कथंसु दुक्खं अच्चेति, कथंसु परिसुज्झति ।।३।।**

---

तदनंतर आळवण यक्षाने भगवन्तास पुढीलप्रमाणे म्हटले

१) (आळवण यक्ष) - या जगात माणसासाठी श्रेष्ठ धन कोणते ? कशाचे पालन (आचरण केल्याने) सुखाची प्राप्ती होते ? सर्व रसांमध्ये श्रेष्ठ (स्वादिष्ट) रस कोणता ? कशा प्रकारच्या जीवनाला श्रेष्ठ जीवन म्हणतात ?

२) (भगवान) - माणसाचे श्रध्दा हे श्रेष्ठ धन आहे. धर्माचे चांगल्या रीतीने आचरण केल्याने सुखाची प्राप्ती होते. सर्व रसांमध्ये सत्य हा सर्वश्रेष्ठ (रूचकर) रस आहे. प्रज्ञापूर्वक आचरण करणाऱ्याच्या जीवनास श्रेष्ठ जीवन म्हणतात.

३) (आळवक यक्ष) - मनुष्य (तृष्णारूपी) पूर (ओघ) कशा रीतीने ओलांडतो व पुनर्जन्मरूपी (संसार) सागर कशा प्रकारे पार करतो ? मनुष्य दुःखापासून दूर कसा जातो व त्याची शुध्दी कशा प्रकारे होते ?

**सध्दाय तरती ओघं अप्पमादेन अण्णवं,**
**विरियेन दुक्खं अच्चेति पञ्ञाय परिसुज्झति ।।४।।**

**कथंसु लभते पञ्ञं कथंसु विन्दते धनं,**
**कथंसु कित्तिं पप्पोति कथं मित्तानि गन्थति,**
**अस्मा लोका परं लोकं कथं पेच्च न सोचति ।।५।।**

**सद्दहानो अरहतं धम्मं निब्बाणपत्तिया,**
**सुस्सूसा लभते पञ्ञं अप्पमत्तो विचक्खणो ।।६।।**

**पतिरूपकारी धुरवा उट्ठाता विन्दते धनं,**
**सच्चेन कित्तिं पप्पोति, ददं मित्तानि गन्थति ।।७।।**

---

४) (भगवान) - मनुष्य तृष्णेचा महापूर श्रध्देच्या मदतीने पार करतो व अप्रमादाने पुनर्जन्मरूपी महासागर ओलांडतो. मनुष्य पराक्रमाच्या मदतीने दुःखापासून मुक्त होतो व प्रज्ञेच्या सहाय्याने तो परिशुध्द होतो.

५) (आळवक यक्ष) - मनुष्य प्रज्ञा कशा रीतीने प्राप्त करतो ? तो धन कशा प्रकारे संपादन करतो ? तो किर्ती कशी प्राप्त करतो? मनुष्य कोणत्या रीतीने मित्र मिळवतो (जोडतो) ? यो लोकातून (इहलोकातून) परलोकात गेल्यावर त्याला कोणत्या कारणाने पश्चाताप (शोक) होत नाही ?

६) (भगवान) - निर्वाणाकडे घेऊन जाणाऱ्या अरहन्तांच्या धर्मामध्ये श्रध्दा ठेवणारा, सावधान (दक्ष) आणि विचक्षण माणूस शुश्रूषेच्या (सेवेच्या) मदतीने प्रज्ञा प्राप्त करतो.

७) (भगवान) -उचित काम करणारा, जबाबादारी स्वीकारणारा व प्रयत्नशील मनुष्य धन प्राप्त करतो. माणूस सत्याच्या मदतीने कीर्ती प्राप्त करतो. दानशूर मनुष्य (अनेक) मित्र जोडतो.

**यस्सेते चतुरो धम्मा सध्दस्स घरमेसिनो,**
**सच्चं धम्मो धिती चागो, सवे पेच्च न सोचति ।८ ।।**

**इङ्घ अञ्ञेपि पुच्छस्सु पुथु समणब्राह्मणे,**
**यदि सच्चा दमा चागा खन्त्या भिय्योन विज्जति ।।९ ।।**

**कथन्नुदानि पुच्छेय्यं पुथू समणब्राह्मणे,**
**सो'हं अज्ज पजानामि यो अत्थो सम्परायिको ।.१० ।।**

**अत्थाय वत मे बुध्दो वासाया लविमागमि ।**
**सो'हं अज्ज पजानामि यत्थ दिन्नं महप्फलं ।।११ ।।**

---

८) (भगवान) - ज्या श्रध्दासम्पन्न गृहस्थामध्ये सत्य, धर्म, धृती (हिंमत) आणि त्याग हे चार गुण असतात तो परलोकात शोक करीत नाही (दुःखी होत नाही). इहलोकातून परलोकात गेल्यावर तो पश्चाताप (शोक) करीत नाही.

९) (भगवान) - सत्य, संयम (दम), त्याग आणि क्षमावृत्ती (शान्ती) यांच्यापेक्षा श्रेष्ठ असे गुण इहलोकांत अस्तित्वात आहेत काय ? या संबंधी तुझी इच्छा असल्यास (आळवका), तू इतर निरनिराळ्या श्रमणांना आणि ब्राह्मणांना विचारून पहा.

१०) (आळवक यक्ष) - आता मी निरनिराळ्या श्रमणांना आणि ब्राह्मणांना या संबंधी कशाला विचारायला पाहिजे. मला आज नीट कळले आहे (समजले आहे) की परलोकात काय फायदेशीर (लाभदायक) असते.

११) (आळवक यक्ष)- खरोखर, माझ्या फायद्यासाठीच भगवान बुध्द आळवीत निवास करण्यासाठी आले. मला आज नीट समजले आहे की, कोणला (कोठे) दान दिल्याने ते लाभदायक होते.

सो अहं विचरिस्सामि गामा गामं पुरा पुरं,
नमस्समानो सम्बुध्दं धम्मस्स च सुधम्मतन्ति ।।१२।।

एवं वुत्ते आलवको यक्खो भगवन्तं एतदवोच, अभिक्कन्तं भो गोतम, अभिक्कन्तं भो गोतम, सेय्यथापि भो गोतम, निक्कुज्जितं वा उक्कुज्जेय्य, पटिच्छन्नं वा विवरेय्य, मूल्हस्स वा मग्गं आचिक्खेय्य, अन्धकारे वा तेलपज्जोतं धारेय्य चक्खुमन्तो रूपानि दक्खिन्तीति । एवमेव भोता गोतमेन अनेक परियानेन धम्मो पकासितो, एसाहं भगवन्तं गोतमं सरणं गच्छामि, धम्मं च भिक्खुसङ्घं च, उपासकं मं भवं गोतमो धारेतु अज्जतग्गे पाणुपेतं सरणं गतन्ति ।

---

१२) (आळवक यक्ष) - तो मी, सम्बुध्द आणि धर्माच्या सुधर्मतेला वन्दन करीत गावोगावी आणि शहराशहरातून विचरण (भ्रमण) करीन.

असे म्हटल्यावर, आळवक यक्षाने भगवन्तास म्हटले, हो महान गोतम, फारच छान ! हो महान गोतम, फारच सुंदर ! जसे पालथे घातलेले भांडे उलथे करावे किंवा डोळस लोकांना पदार्थ दिसावे म्हणून अंधारात मशाल पाजळावी, त्याप्रमाणे आपण अनेक रीतीने धर्म प्रकाशित केला आहे. हा मी भगवान गोतमाला, धर्माला आणि भिक्षुसंघाला शरण जातो. आजपासून जिवंत असेपर्यंत शरण गेलेला मी उपासक आहे. असे स्विकारावे.

## २५. कसीभारद्वाज सुत्तं

एवं मे सुतं, एकं समयं भगवा मगधेसु विहरति दक्खिणागिरिस्मिं एकनालायं ब्राह्मणगामे । तेन खो पन समयेन कसीभारद्वाजस्स ब्राह्मणस्स पञ्चमत्तानि नङ्गलसतानि पयुत्तानि होन्ति वप्पकाले । अथ खो भगवा पुब्बण्हसमयं निवासेत्वा पत्तचीवरमादाय येन कसीभारद्वाजस्स ब्राह्मणस्स कम्मन्तो तेनुपसङ्कमि ।

तेन खो पन समयेन कसीभारद्वाजस्स ब्राह्मणस्स परिवेसना वत्तति । अथ खो भगवा येन परिवेसना तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा एकमन्तं अट्ठासि अद्दसा खो कसीभारद्वाजो ब्राह्मणो भगवन्तं पिण्डाय ठितं, दिस्वान भगवन्तं एतदवोच, अहं खो समण कसामि च वपामि, च कसित्वा च वपित्वा च भुञ्जामि, त्वम्पि समण, कसस्सु च वपस्सु च, कसित्वा च वपित्वा च भुञ्जस्सूति ।

---

### २५. कृषिभारद्वाजसूत्र

मी असे ऐकले आहे की, एके समयी भगवान बुध्द मगधातील दक्षिणगिरी प्रदेशात एकनाळा नावाच्या ब्राह्मणगावात निवास करीत होते. त्या वेळी कृषिभारद्वाज नावाचा एक ब्राह्मण पाचशे नांगर घेऊन पेरणीच्या कामात गुंतला होता. त्या समयी भगवान बुध्द, सकाळच्या प्रहरी (दुपारच्या आधी), भिक्षुवस्त्रे नेसून, भिक्षुपात्र व चीवर (वस्त्रे) आपल्या बरोबर घेऊन, कृषिभारद्वाजाच्या शेतात (कामाच्या स्थळी) पोहोचले.

त्या समयी कृषिभारद्वाज ब्राह्मणाने भोजनवाढप चालू होते. भगवान बुध्द तेथे जाऊन एका बाजूला (भोजनाच्या स्थानी) उभे राहिले. कृषिभारद्वाज ब्राह्मणाने भगवन्तांना भिक्षेसाठी तेथे उभे राहिलेले पाहिजे. त्यांना तेथे पाहून तो भगवन्तांना म्हणाला, श्रमणा, मी (जमिन) नांगरतो व (धान्य) पेरतो (व कापणी करतो). नांगरून व पेरून मी माझे पोट भरतो. श्रमणा, तू पण जमीन नांगर आणि धान्य पेर. नांगरून आणि पेरून तू स्वतः चे भरणपोषण (निर्वाह) कर.

**अहम्पि, खो ब्राह्मण, कसामि च वपामि च, कसित्वा च वपित्वा च भुञ्जामीति ।**

**न खो पन मयं पस्साम भोतो गोतमस्स युगं वा नङ्गलं वा, फालं वा पाचनं वा बलिवद्दे वा, अथ च पन भवं गोतमो एवमाह :- अहम्पि खो ब्राह्मण, कसामि च वपामि च, कसित्वा च वपित्वा च भुञ्जामीति ।**

**अथ खो कसीभारव्दाजो ब्राह्मणो भगवन्तं गाथाय अज्झभासि :-**

**कस्सको पटिजानासि, न च पस्साम ते कसिं,**

**कसिं नो पुच्छितो ब्रूहि, यथा जानेमु ते कसिं ।।१ ।।**

---

ब्राह्मणा, मी सुध्दा नांगरणी करतो व पेरणी करतो. (जमीन) नांगरून व पेरणी करून मी माझे पोट भरतो.

आदरणीय, गौतमाजवळ जू, नांगर, फाळ, टोचणी, आणि बैल यांपैकी मला तर काहीच दिसत नाही आणि तरी सुध्दा आदरणीय गौतम असे म्हणाला, मी पण नांगरणी करतो व पेरणी करतो. नांगरून व पेरून, मी माझे पोट भरतो.

असे म्हणून कृषिभारव्दाज ब्राह्मणाने भगवन्तांना उद्देशून पुढील गाथा म्हटल्या :-

१) (कृपिभारव्दाज म्हणाला), तू आपणास कृषक (शेतकरी) म्हणतोस, पण तुझी शेती आम्हांला दिसत नाही. आम्ही तुला तुझ्या शेतीविषयी विचारत आहोत. तेव्हा आम्हांला सांग की आम्ही तुझी शेती कशी जाणावी.

**सध्दा बीजं तपो वुट्ठीं, पञ्ञा मे युगनङ्गलं ।**
**हिरी ईसा मनो योत्तं, सति मे फालपाचनं ।।२ ।।**

**कायगुत्तो वचीगुत्तो, आहारे उदरे यतो,**
**सच्चं करोमि निद्दानं सोरच्चं मे पमोचनं ।।३ ।।**

**विरियं मे धुरधोरय्हं योगक्खेमाधिवाहनं,**
**गच्छति अनिवत्तन्तं, यत्थ गन्त्वा न सोचति ।।४ ।।**

**एवमेसा कसी कट्ठा सा होति अमतप्फला,**
**एतं कसिं कसित्वान, सब्बदुक्खा पमुच्चतीति ।।५ ।।**

---

२) (भगवान म्हणाले) - श्रध्दा हे माझे बीज आहे व तपश्चर्या ही वृष्टी आहे. माझी प्रज्ञा माझे जू व नांगर आहे. लज्जा ही माझ्या नांगराचा दण्ड आहे, चित्त ही दोरी आहे आणि स्मृती (जागृती) माझा फाळ व टोणी (चाबूक) आहे.

३) शरीराने व वाणीने मी संयत आहे. अन्न खाण्याच्या बाबतीत मी संयमी आहे. सत्याने मी रानटी गवत कापून टाकतो, आणि विनय ( निर्वाणाची रूची) हाच माझा मोक्ष (मुक्ती ) आहे.

४) माझा पराक्रम (उत्साह) धुरा वाहणारी माझ्या नांगराला लावलेली माझी बैलांची जोडी आहे, मी मला निर्वाणाच्या सुरक्षिततेकडे न थांबता घेऊन जाते आणि तेथे गेल्यावर माणसाला शोक करावा लागत नाही.

५) ही माझी शेती मी अशा प्रकारे केली आहे. ही शेती अमरत्वाचे फळ देणारी आहे. अशी शेती केल्याने मनुष्य सर्व दुःखापासून मुक्त होतो.

**अथ खो कसिभारव्दाजो ब्राह्मणो महतिया कंसपातिया पायासं वड्ढेत्वा भगवतो उपनामेसि, भुञ्जतु भवं गोतमो पायासं कस्सको भवं गोतमो, यं हि भवं गोतमो अमतप्फलं कसिं कसतीति।**

**गाथाभिगीतं मे अभोजनेय्यं सम्पस्सतं ब्राह्मण नेस धम्मो,**

**गाथाभिगीतं पनुदन्ति बुध्दा । धम्मे सति ब्राह्मण वुत्तिरेसा ।।**

**अञ्ञेन च केवलिनं महेसिं खीणासवं कुक्कुच्चवूपसन्तं.**

**अन्नेन पानेन उपट्ठहस्सु खेत्तं हि तं पुञ्ञपेक्खस्स होतीति।।**

---

तदनंतर कृषिभारव्दाज ब्राह्मणाने एका तांब्याच्या थाळीत खीर भरून आणली आणि ती थाली भगवन्तांच्या पुढे ठेऊन म्हटले, आदरणीय गौतम, आपण ही खीर घ्यावी (खावी). अमरत्वाचे फळ देणारी शेती आपण करीत असल्याने आपण खरे शेतकरी आहात.

६) (भगवान बुध्द म्हणाले) - धर्मोपदेश केल्यामुळे (अन्नासंबंधी गाथा बोलल्यामुळे) प्राप्त झालेले भोजन स्वीकारणे मला योग्य वाटत नाही. हे ब्राह्मणा, सम्यक् दृष्टी असलेल्यांचा (जाणत्यांचा) हा धर्म नव्हे. धर्मोपदेश केल्याने (अन्नासंबंधी गाथा बोलल्यामुळे) मिळालेले भोजन बुध्द स्विकारीत नाही. जोपर्यंत धर्म (सदाचार) अस्तित्वात असेल तोपर्यंत हीच स्थिती राहीली असेल.

७) तू दुसऱ्या कोणा पूर्णत्व पावलेल्या, दुष्प्रवृत्तींचा नाश केलेल्या, चंचलतारहित अशा महर्षींची अन्न आणि पाणी देऊन सेवा कर. पुण्याची अपेक्षा करणाऱ्यासाठी ते योग्य क्षेत्र आहे.

**अथ कस्स चाहं गोतम इमं पायासं दम्मीति । नख्वाहन्तं, ब्राह्मण पस्सामि सदेवके लोके समारके सब्रह्मके सस्समणब्राह्मणिया पजाय सदेवमनुस्साय यस्स सो पायासो भुत्तो सम्मा परिणामं गच्छेय्य अञ्ञत्र तथागतस्स वा तथागत सावकस्स वा, तेनहि त्वं, ब्राह्मण तं पायासं अप्पहरिते वा छड्डेहि अप्पाणके वा उदके ओपिलापेहीति ।**

**अथ को कसीभारव्दाजो ब्राह्मणो तं पायसं अप्पाणके उदके ओपिलापेसि । अथ खो सो पायासो उदके पक्खित्तो चिच्चिटायति चिटिचिटायति सन्धुपायति सम्पधूपायति सेय्यथापि नाम फालो दिवससन्तत्तो उदके पक्खित्तो चिच्चिटायति चिटिचिटायति सन्धूपायाति सम्पधूपायति । अथ खो कसीभारव्दाजो ब्राह्मणो संविग्गो लोमहट्ठजातो येन भगवा तेनुपसङ्कमित्वा भगवतो पादेसु सिरसा निपतित्वा भगवन्तं एतदवोच ।**

---

गौतम, (अशा परिस्थितीत) ही खीर (पायास) मी कोणाला देऊ ?

ब्राह्मणा, देव, मनुष्य, मार, ब्रह्मदेव आणि श्रमणब्राह्मण या सहित सर्व जगामध्ये, देव आणि माणसांच्या समुदायात तथागत किंवा त्याचा शिष्य याच्या अपवादाशिवाय मला अशी क पण व्यक्ती दिसत नाही की तिने ही खीर (पायास) खाल्ली तर ती तिला पचू शकेल. म्हणून हे ब्राह्मणा, तू ती खीर गवत नसलेल्या कोरड्या जागेवर ओतून टाक किंवा जीवजंतू नसलेल्या जलाशयात फेकून दे.

तदनंतर कृषिभारव्दाज ब्राह्मणाने ती खीर जीवजंतू येथे नव्हते, अशा जलाशयात ओतून टाकली. ती खीर पाण्यात पडताचक्षणी चिटीचिटी चिटीचिटी आवाज करून दाटधूर उत्पन्न करू लागली, दाट धूर पाठवू लागली. ज्याप्रमाणे दिवसभर तापलेला नांगराचा फाळ पाण्यात टाकल्यास, चिटीचिटी चिटीचिटी असा आवाज करून दाट धूर (वाफ) उत्पन्न करतो, दाटधूर फेकून देतो, त्याप्रमाणे ती खीर पाण्यात ओतता (पडता) क्षणीच चिटीचिटी चिटीचिटी असा आवाज करून दाट धूर उत्पन्न करू लागली आणि दाट धूर फेकून लागली. त्यानंतर कृषिभारव्दाज ब्राह्मणाला संवेग झाला व रोमहर्षित (आश्चर्यचकित) होऊन भगवान जेथे होते तिथे गेला व तेथे जाऊन भगवन्तांच्या पायवर मस्तक ठेवून म्हणाला :-

**अभिक्कन्तं भो गोतम! अभिक्कन्तं भो गोतम ! सेय्यथापि भो गोतम निक्कुज्जितं वा उक्कुज्जेय्य, पटिच्छन्नं वा विवरेय्य, मूल्हस्स वा मग्गं आचिक्खेय्य अन्धकारे व तेलपज्जोतं धारेय्य चक्खुमन्तो रूपानि दक्खिन्तीति, एवमेव भोता गोतमेन अनेक परियायेन धम्मो पकासितो, एसाहं भगवन्तं गोतमं सरणं गच्छामि, धम्मं च भिक्खुसङ्घं च । लभेय्यामहं भोतो गोतमस्स सन्तिके पब्बज्जं लभेय्यं उपसम्पदन्ति ।**

**अलत्थ खो कसीभारव्दाजो ब्राह्मणो भगवतो सन्तिके पब्बज्जं लभेय्यं उपसम्पदन्ति ।**

**अलत्थ खो कसीभारव्दाजो ब्राह्मणो भगवतो सन्तिके पब्बज्जं, अलत्थ उपसम्पदं ।**

---

हे गौतमा, अत्यंत सुंदर ! हे गौतमा, अत्यंत छान ! हे गौतमा, ज्याप्रमाणे पालथी वस्तू सुलट करावी, झाकलेली वस्तू उजेडात आणावी, मार्ग चुकलेल्या माणसाला योग्य मार्ग दाखवावा किंवा अंधारात तेलाचा दिवा लावावा की ज्याच्यामुळे डोळस माणसांना वस्तू दिसू शकतील, त्याप्रमाणे गौतमाने अनेक प्रकारे धर्मोपदेश केला आहे. म्हणून मी भगवान गौतमांना, त्याच्या धर्माला व भिक्षुसंघाला शरण जात आहे. मला भगवान गौतमाजवळ प्रव्रज्या व उपसम्पदा प्राप्त होवो.

तदनंतर कृषिभारव्दाज ब्राह्मणाला भगवन्ताजवळ प्रव्रज्या व उपसम्पदा प्राप्त झाली.

**अचिरूपसम्पन्नो खो पनायस्मा भारव्दाजो एको वूपकट्ठो अप्पमत्तो आतापि पहितत्तो विहरन्तो न चिरस्सेव यस्सत्थाय कुलपुत्ता सम्मदेव अगारस्मा अनगारियं पब्बजन्ति तदनुत्तरं ब्रह्मचिरयपरियोसानं दिट्ठेवधम्मे सयं अभिञ्ञा सच्छिकत्वा उपसम्पज्ज विहासि, खीणा जाति, वुसितं ब्रह्मचरियं कतं करणीयं नापरं इत्थत्तायाति अब्भञ्ञासि । अञ्ञतरो च खो पनायस्मा भारव्दाजो अरहतं अहोसीति ।**

## २६ - पराभव सुत्तं

**एवं मे सुतं, एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । अथ खो अञ्ञतरा देवता अभिक्कन्ताय रत्तिया अभिक्कन्तवण्णा केवलकप्पं जेतवनं ओभासेत्वा येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं अट्ठासि । एकमन्तं ठिता खो सा देवता भगवन्तं गाथाय अज्झभासि ।**

---

उपसम्पदा प्राप्त झाल्यावर थोड्या काळानंतर (काही दिवसानंतरच) कृषिभारव्दाज ब्राह्मण एकान्तवासात एकाकी, अप्रमादी (धम्मचारी) उद्यमी उत्साही व तत्पर होऊन ज्यासाठी कुलपूत्र चांगल्या रीतीने गृहत्याग केल्यावर गृहहीन अवस्था (संन्यास) स्वीकारतात, त्या सर्वश्रेष्ठ ब्रह्मचर्याचे फळ (ध्येय), स्वतःच्या ज्ञानाने संपादन करून व प्राप्त करून, त्याला ज्ञान झाले माझा पुनर्जन्म क्षीण (नष्ट) झाला आहे, मी ब्रह्मचर्याचे पालन केले आहे, मी माझे कर्तव्य पार पाडले आहे आणि मला पुन्हा जन्म घ्यावा लागणार नाही. अशा रीतीने आयुष्यमान भारव्दाज एक अरहन्त झाला.

### २६. पराभवसुत्त

मी असे ऐकले आहे की, एके समयी भगवान बुध्द श्रावस्तीत जेतवनात अनाथपिण्डिकाच्या  वनोद्यानात राहत होते. तेव्हा रात्र संपत आली असता (पहाटेच्या समयी) एक देवता आपल्या सौन्दर्याच्या उज्वल प्रकाशाने सर्व जेतवनास प्रकाशित करीत, जेथे भगवान बसले होते तेथे गेली आणि भगवन्तांना अभिवादन करून एका बाजूस उभी राहिली. एका बाजूस उभी असलेली ती देवता (देवी) भगवन्ताशी गाथेने म्हटली -

**पराभवन्तं पुरिसं मयं पुच्छाम गोतमं,**
**भगवन्तं पुट्ठुमागम्म किं पराभवतो मुखं ॥१॥**

**सुविजानो भवं होति सुविजानो पराभवो,**
**धम्मकामो भवं होति धम्मदेस्सी पराभवो ॥२॥**

**इति हेतं विजानाम, पठमो सो पराभवो,**
**दुतियं भगवा ब्रुहि किं पराभवतो मुखं ॥३॥**

**असन्तस्स पिया होन्ति सन्ते न कुरूते पियं,**
**असतं धम्मं रोचेति तं पराभवतो मुखं ॥४॥**

**इति हेतं विजानाम, दुतियो सो पराभवो,**
**तातियं भगवा ब्रुही किं पराभवतो मुखं ॥५॥**

---

१) (देवता) - आम्ही भगवन्ताजवळ विचारण्यास येऊन पराभव पावणारा पुरूष कोणता ते विचारतो ? पराभवाचे कारण कोणते ?

२) (भगवान)- जय (यश) पावणारा पुरूष सहज जाणता येतो व पराजय (अपयश) पावणारा पुरूष पण सहज जाणता येतो. जय पावणारा धर्मपरायण असतो व पराजय पावणारा धर्माचा द्वेष करतो.

३) (देवता) - हा पहिला पराभव आम्हांस समजला. भगवान, दुसरे पराभवाचे कारण कोणते ते सांगा.

४) (भगवान) - (पराभव पावणाऱ्याला) पुरूषाला दुष्ट प्रिय असतात व सज्जन अप्रिय असतात. त्याला दुष्टांचा धर्म आवडतो व हेच (त्याच्या) पराभवाचे कारण आहे.

५) (देवता)- हा दुसरा पराभव आम्हांस समजला. भगवान, तिसरे पराभवाचे कारण कोणते ते सांगा.

निद्दासीली सभासीली अनुट्ठाता च यो नरो,
अलसो कोधपञ्ञाणो तं पराभवतो मुखं ।।६ ।।

इति हेतं विजानाम ततियो सो पराभवो,
चतुत्थं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ।।७ ।।

यो मातरं वा पितरं वा, जिण्णकं गतयोब्बनं ।
पहुसन्तो न भरति, तं पराभवतो मुखं'' ।।८ ।।

इति हेतं विजानाम चतुत्थो सो पराभवो,
पञ्चमं भगवा ब्रूही किं पराभवतो मुखं ।.९ ।।

यो ब्राह्मणं वा समणं वा अञ्ञं वा पि वनिब्बकं,
मुसावादेन वञ्चेति तं पराभवतो मुखं ।।१० ।।

---

६) (भगवान) - निद्राशील, सभाप्रिय, प्रयत्न न करणारा, आळशी आणि रागीट मनुष्य, ते (त्याच्या) परभावचे कारण होय.

७) (देवता) - हा तिसरा पराभव आम्हांस समजला. भगवान, चौथे पराभवाचे कारण कोणते सांगा.

८) (भगवान)- जो स्वतः समर्थ असूनही आपल्या वृध्द व वयातीत (थकलेल्या) आईबापांचे भरणपोषण करीत नाही, ते त्याच्या पराभवाचे कारण होय.

९) (देवता) - हा चवथा पराभव आम्हांस समजला. भगवान, पाचवे पराभवाचे कारण कोणते ते सांगा.

१०) (भगवान) - जो ब्राह्मणाला किंवा श्रमणाला किंवा दुसऱ्या कोणा संन्याशाला खोटे बोलून फसवतो, ते (कर्म) त्याच्या पराभवाचे कारण होय.

**इति हेतं विजानाम पञ्चमो सो पराभवो,**
**छट्ठमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ।।११।।**
**पहूतवित्तो पुरिसो सहिरञ्ञो सभोजनो,**
**एको भुञ्जति सादूनि तं पराभवतो मुखं ।.१२।।**
**इति हेतं विजानाम छट्ठमो सो पराभवो,**
**सत्तमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ।।१३।।**
**जतित्थध्दो धनत्थध्दो गोत्तत्थध्दो च यो नरो,**
**सञ्ञातिं अतिमञ्ञेति तं पराभवतो मुखं ।।१४।।**
**इति हेतं विजानाम सत्तमो सो पराभवो,**
**अट्ठमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ।।१५।।**

---

११) (देवता) - हा पाचवा पराभव आम्हांस समजला. भगवान, सहावे पराभवाचे कारण कोणते ते सांगा.

१२) (भगवान) - ''पुष्कळ संपत्ती व धन आणि धान्य असलेला जो मनुष्य गोड अन्न एकटाच खातो, ते (कर्म) त्याच्या पराभवाचे कारण होय.

१३) (देवता) - हा सहावा पराभव आम्हांस समजला. भगवान, सातवे पराभवाचे कारण कोणते ते सांगा.

१४) (भगवान) - कुळ, धन व गोत्र यांचा गर्व करणारा जो मनुष्य आपल्या नातलगाची अवहेलना करतो, तेच त्यांच्या पराभवाचे कारण होय.

१५) (देवता)- हा सातवा पराभव आम्हांस समजला. भगवान, आठवे पराभवाचे कारण कोणते ते सांगा.

**इत्थिधुत्तो सुराधुत्तो अक्खधुत्तो च यो नरो,**
**लध्दं लध्दं विनासेति तं पराभवतो मुखं ।।१६ ।।**

**इति हेतं विजानाम अट्ठमो सो पराभवतो,**
**नवमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ।।१७।।**

**सेहि दारेहि सन्तुट्ठो वेसियासु पदिस्सति,**
**दिस्सति परदारेसु तं पराभवतो मुखं ।।१८।।**

**इति हेतं विजानाम नवमो सो पराभवतो,**
**दसमं भगवा ब्रुहि किं पराभवतो मुखं ।।१९।।**

**अतीतयोब्बनो पोसो आनेति तिम्बरूत्थनिं,**
**तस्सा इस्सा न सुपति तं पराभवतो मुखं ।।२० ।।**

---

१६) (भगवान) - व्यभिचारी, मद्यपी व जुगारी होऊन जो मनुष्य जे जे मिळेल ते ते घालवितो, ते (त्याच्या) पराभवाचे कारण होय.

१७) (देवता) - हा आठवा पराभव आम्हांस समजला, भगवान नववे पराभवाचे कारण कोणते ते सांगा.

१८) (भगवान) - स्वतःच्या पत्नीच्या संगतीत संतोष न मानता जो वेश्यागमन व परस्त्रीगमन करतो, ते (कर्म) त्याच्या पराभवाचे कारण होय.

१९) (देवता) - हा नववा पराभव आम्हांस समजला. भगवान, दहावे पराभवाचे कारण कोणते ते सांगा.

२०) (भगवान) - जे गतयौवन (वयातीत) पुरूष तिंबरू वृक्षाच्या फळाप्रमाणे (लहान) स्तन असलेल्या (तरूण) स्त्रींशी लग्न करतो व तिच्या ईर्षेने झोपत नाही, ते (त्याच्या) पराभवाचे कारण होय.

**इति हेतं विजानाम दसमो सो पराभवो,**
**एकादसमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ।।२१।।**

**इत्थि सोण्डिं विकिरणिं पुरिसं वापि तादिसं ।**
**इस्सरियस्मिं ठपापेति तं पराभवतो मुखं ।।२२।।**

**इति हेतं विजानाम, एकादसमो सो पराभवो,**
**व्दादसमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ।।२३।।**

**अप्पभोगो महातण्हो खत्तिये जायते कुले,**
**सो च रज्जं पत्थयति तं पराभवतो मुखं ।।२४।।**

**एते पराभवे लोके पण्डितो समवेक्खिय,**
**अरियो दस्सनमसम्पन्नो स लोकं भजते सिवन्ति'' ।।२५।।**

---

२१) (देवता) - हा दहावा पराभव आम्हांस समजला. भगवान, अकरावे पराभवाचे कारण कोणते ते सांगा.

२२) (भगवान) - व्यसनी आणि उधळ्या स्त्रीला किंवा तशाच पुरूषाला जो मनुष्य अधिकारपदावर नेमतो, ते त्याचे कर्म (त्याच्या) पराभवाचे कारण होय.

२३) (देवता) - हा अकरावा पराभव आम्हांस समजला. भगवान, बारावे पराभवाचे कारण कोणते ते सांगा.

२४) (भगवान) - क्षत्रिय कुळात जन्मलेला, गरीब (निर्धन) असून हाव मोठी असलेली मनुष्य इहलोकी राज्य मिळविण्याच्या प्रयत्न करतो, ते (त्याचे कृत्य) त्याच्या पराभवाचे कारण होय.

२५) (भगवान) - पंडित व तत्वज्ञानी असा आर्य पुरूष पराभवाची (पराजयाची-अपयशाची) ही सर्व कारणे यथायोग्य स्वरूपात जाणून, कल्याणपद लोकात पुनर्जन्म पावतो.

## २७ - वसल सुत्तं

**एवं मे सुतं, एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । अथ खो भगवा पुब्बण्हसमयं निवासेत्वा पत्तचीवरमादाय सावत्थियं पिण्डाय पाविसि । तेन खो पन समयेन अग्गिकभारव्दाजस्स ब्राह्मणस्स निवेसने अग्गि पज्जलितो होति आहुति पग्गहिता । अथ खो भगवा सावत्थियं सपदानं पिण्डायं चरमानो येन अग्गिकभारव्दाजस्स ब्राह्मणस्स निवेसनं तेनुपसङ्कमि ।**

**अद्दसा खो अग्गिकभारव्दाजो ब्राह्मणो भगवन्तं दूरतोव आगच्छन्तं दिस्वान भगवन्तं एतदवोच, तत्रेव मुण्डक, तत्रेव समणक, तत्रेव वसलक, तिट्ठाहीति । एवं वुत्ते भगवा अग्गिकभारव्दाजं ब्राह्मणं एतदवोचः जानासि पन त्वं, ब्राह्मण वसलं वा वसलकरणे वा धम्मेति ।**

---

### २७ - वृषलसूत्र

मी असे ऐकले आहे की, एके समयी भगवान बुध्द श्रावस्तीत जेतवनात अनाथपिण्डिकाच्या उद्यानात विहार करीत होते. एके दिवशी भगवान बुध्द सकाळच्या प्रहरी भिक्षुवस्त्रे धारण करून, भिक्षापात्र व चीवर घेऊन, श्रावस्ती नगरीत भिक्षा मागण्यासाठी निघाले. त्या समयी अग्निकभाकद्वाज ब्राह्मणाच्या घरी अग्नी प्रज्वलित करण्यात आला होता आणि त्यात आहुती दिली जात होती. नंतर भगवान बुध्द श्रावस्ती नगरीत घरोघरी क्रमशः भिक्षा मागत फिरत असता, ते अग्निभारद्वाज ब्राह्मणाच्या घरापाशी पोहोचले.

अग्निकभारद्वाज ब्राह्मणाने दुरूनच भगवान बुध्दाला (आपल्या घराकडे) येताना पाहिले. त्यांना पाहिल्यावर, तो भगवन्तांना म्हणाला, हे मुण्डक, (डोक्याचे मुंडन केलेल्या श्रमणा), तेथेच (दूर) उभा रहा. हे श्रमणका, तेथेच दूर उभा रहा. हे वृषलका (चांडाळा), तेथेच दूर उभा रहा. त्याने असे म्हटल्यावर, भगवन्तांन ी अग्निकभारद्वाज ब्राह्मणाला म्हटले, हे ब्राह्मणा, वृषल (चांडाळा) कोण आणि चांडाळाचे गुण कोणते, ते तुला माहित आहे का?

**नख्वाहं भो गोतम, जानामि वसलं वा वसलकरणे वा धम्मे, साधु मे भवं गोतमो, तथा धम्मं देसेतु यथाहं जानेय्यं वसलं वा वसलकरणे वा धम्मेति । तेन हि, ब्राह्मण सुणाहि साधुकं मनसिकरोहि भासिस्सामीति ।**

**एवम्भोति खो अग्गिकभारव्दाजो ब्राह्मणो भगवतो पच्चस्सोसि। भगवा एतदवोच**

**कोधनो उपनाही च, पापमक्खी च यो नरो,**
**विपन्नदिट्ठि मायावी तं जञ्ञा वसलो इति ।।१ ।।**

**एकजं वा द्विजं वापि योध पाणानि विहिंसति ।**
**यस्स पाणे दया नत्थि तं जञ्ञा वसलो इति ।।२ ।।**

---

हे गौतमा, चांडाळ (वसल-वृषल) कोण आणि चांडाळाचे गुण कोणते, याचे मला ज्ञान नाही. भगवान गौतमाने मला त्याच्या धर्माचा उपदेश अशा कुशलतेने करावा की जेणेकरून मला चांडाळ आणि चांडाळाचे गुणधर्म यांचे ज्ञान व्हावे, असे असल्यास, हे ब्राह्मणा, (मी सांगतो ते) नीट ऐक आणि नीट लक्षात ठेव. आता मी तुला धर्मोपदेश देतो.

भगवन्तांचे हे शब्द ऐकल्यावर अग्निकभारद्वाज ब्राह्मणाने भगवन्ताचा उत्तरादाखल म्हटले, ठीक आहे. भगवान म्हणाले :-

१) जो मनुष्य क्रोधी, वैरी (सुडबुध्दी धरणारा), पापी, ईर्षा करणारा, मिथ्यामतधारी, चुकीची मते धारण करणारा व मायावी असतो, त्याला चांडाळ (वसल-वृषल) जाणावे.

२) जो मनुष्य योनिज (पशू, माणूस) किंवा पक्षी (अंड्यातून जन्म पावणाऱ्या) प्राण्यांची हिंसा करतो आणि ज्याला प्राण्याप्रती (प्राणीमात्रांची) दया नसते, त्याला वृषल (चांडाळ) जाणावे.

**यो हन्ति परिरून्धति गामानि निगमानि च,**
**निग्गाहको समञ्ञातो तं जञ्ञा वसलो इति ।।३ ।।**

**गामे वा यदि वारञ्ञे यं परेसं ममायितं,**
**थेय्या अदिन्नं आदियति तं जञ्ञा वसलो इति ।।४ ।।**

**यो हवे इणमादाय चुज्जमानो पलायति,**
**नहि ते इणमत्थीति, तं जञ्ञा वसलो इति ।।५ ।।**

**यो वे किञ्चिक्खकम्यता पन्थस्मिं वजतं जनं,**
**हन्त्वा किञ्चिक्खमादेति तं जञ्ञा वसलो इति ।।६ ।।**

**यो अत्तहेतु परहेतु धनहेतु च यो नरो,**
**सक्खिपुट्ठो मुसा ब्रूति तं जञ्ञा वसलो इति ।।७ ।।**

---

३) जो मनुष्य गावांना तसेच नगरांना वेढा घालून त्यांची लूट करतो. त्यांना ओसाड (निर्मनुष्य) करून टाकतो आणि जो लुटारू (दरोडेखोर) म्हणून ओळखला जातो, त्याला वृषल (चांडाळ) जाणावे.

४) जो मनुष्य गावात किंवा अरण्यात दुसऱ्याच्या मालकीची संपत्ती चोरी करून घेतो, त्याला वृषल (चांडाळ) समजावे.

५) जो मनुष्य ऋण (कर्ज) घेऊन त्याची परतफेड करण्यास सांगितल्यावर 'मला तुझे काहीही देणे नाही' असे म्हणून पळून जातो, त्याला वृषल (चांडाळ) समजावे.

६) जो एखाद्या वस्तूच्या इच्छेने (प्रलोभनाने) रस्त्याने चालणाऱ्या वाटसरूला ठार मारून त्याची वस्तू बळजबरीने लुटून घेतो, त्याला वृषल (चांडाळ) जाणावे.

७) जो स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या लाभासाठी किंवा धन मिळविण्यासाठी खोटी साक्ष देतो, त्याला वृषल (चांडाळ) समजावे.

**यो ञातीनं सखानं वा, दारेसु पतिदिस्सति,**
**सहसा सम्पियेन वा, तं जञ्ञा वसलो इति ।।८ ।।**

**यो मातरं वा पितरं वा जिण्णकं गतयोब्बनं,**
**पहुसन्तो न भरति तं जञ्ञा वसलो इति ।।९ ।।**

**यो मातरं वा पितरं वा भातरं भगिनिं ससुं ।**
**हन्ति रोसेति वाचाय तं जञ्ञा वसलो इति ।।१० ।।**

**यो अत्थं पुच्छितो सन्तो अनत्थमनुसासति,**
**पटिच्छन्नेन मन्तेति तं जञ्ञा वसलो इति ।।११ ।।**

**यो कत्वा पापकं कम्मं मा मं जञ्ञाति इच्छति,**
**यो पटिच्छन्नकम्मन्तो तं जञ्ञा वसलो इति ।।१२ ।।**

---

८) जो बळजबरीने किंवा प्रेमभावाने स्वतःच्या नातलगांच्या किंवा मित्रांच्या पत्नीच्या सहवासात दंग असतो (त्यांच्याशी वाममार्गाने आचरण करताना दिसतो) त्याला वृषल (चांडाळ) समजावे.

९) जो समर्थ असतानाही आपल्या म्हाताऱ्या व वयातील आई बापांचे भरणपोषण करीत नाही, त्याला वृषल (चांडाळ) जाणावे.

१०) जो आई, बाप, भाऊ, बहिण आणि सासू यांना शारीरिक पीडा देतो वा त्यांना वाणीने दुखवितो, त्याला वृषल (चांडाळ) समजावे.

११) ज्याला हितकारी सल्ला विचारला असता जो अहितकारी सल्ला देतो व लपवालपवी (संदिग्ध) शब्दात संभाषण करतो, त्याला वृषल (चांडाळ) जाणावे.

१२) जो पापचरण करूनही दुसऱ्यांना ते कळू नये अशी इच्छा करतो आणि ज्याची कर्मे (कृत्ये) लपूनछपून चाललेली असतात, त्याला वृषल (चांडाळ) जाणावे.

**यो वे परकुलं गन्त्वा भुत्वान सुचिभोजनं ।**
**आगतं न पटिपूजेति तं जञ्ञा वसलो इति ।।१३।।**

**यो ब्राह्मणं वा समणं वा अञ्ञं वापि वनिब्बकं,**
**मुसावादेन वञ्चेति तं जञ्ञा वसलो इति ।।१४।।**

**यो ब्राह्मणं वा समणं वा भत्तकाले उपट्ठिते,**
**रोसेति वाचा न च देति तं जञ्ञा वसलो इति ।।१५।।**

**असतं योध पब्रूति मोहेन पलिगुण्ठितो,**
**किञ्चिक्खं निजिगिंसानो तं जञ्ञा वसलो इति ।।१६।।**

**यो चत्तानं समुक्कंसे परं च मवजानति,**
**निहीनो सेन मानेन, तं जञ्ञा वसलो इति ।।१७।।**

---

१३) जो दुसऱ्याच्या घरी जाऊन स्वादिष्ट जेवण जेवतो पण तो मनुष्य आपल्या घरी आला असताना त्याचा पाहुणचार करीत नाही, त्याला वृषल (चांडाळ) समजावे.

१४) जो मनुष्य ब्राह्मण, श्रमण किंवा अन्य याचकाला असत्य बोलून फसवतो, त्याला वृषल (चांडाळ) जाणावे.

१५) जो मनुष्य दुपारच्या भोजनाच्यासमयी आपल्या दारी आलेल्या ब्राह्मणाला किंवा श्रमणाला, क्रोधायुक्त शब्द बोलतो (वाणीने दुखावतो) आणि काहीही खावयास देत नाही, त्याला वृषल (चांडाळ) समजावे.

१६) जो लोभात (मोहात) गुरफटलेला असल्याने काही वस्तूच्या इच्छेने असत्य बोलतो, त्याला वृषल (चांडाळ) समजावे.

१७) अहंमन्यतेने पतित (नीच) असा जो मनुष्य आत्मस्तुती व परनिन्दा करतो, त्याला वृषल (चांडाळ) जाणावे.

**रोसको कदरियो च पापिच्छो मच्छरी सठो,।।**
**अहिरिको अनोत्तापि, तं जञ्ञा वसलो इति ।।१८ ।।**

**यो बुध्दं परिभासति अथवा तस्स सावकं,**
**परिब्बाजं गहट्ठं वा तं जञ्ञा वसलो इति ।।१९।।**

**यो वे अनरहा सन्तो अरहं पटिजानति,**
**चोरो सब्रह्मके लोके एस खो वसलाधमो,**
**एते खो वसलो वुत्ता मया वो ये पकासिता ।।२० ।।**

**न जच्चा वसलो होति न जच्चा होति ब्राह्मणो,**
**कम्मना वसलो होति, कम्मना होति ब्राह्मणो ।।२१ ।।**

**तदमिनापि विजानाथ यथा मेदं निदस्सनं ।**
**चण्डालपुत्तो सोपाको मातङ्गो इति विस्सुतो ।।२२ ।।**

---

१८) जो मनुष्य चिडखोर (क्रोधी), कृपण, मनात पापी इच्छा बाळगणारा, मत्सरी, शठ निर्लज्ज व बेशरम (लोकापवादभयरहित) असतो, त्याला वृषल (चांडाळ) जाणावे.

१९) जो मनुष्य बुध्द, त्याचा शिष्य, परिव्राजक किंवा गृहस्थ यांना उद्देशून अपशब्द बोलतो, त्याला वृषल (चांडाळ) समजावे.

२०) जो मनुष्य स्वतः अरहन्त नसतांना स्वतःला अरहन्त म्हणवतो. तो इहलोकात व ब्रह्मलोकात चोर आहे. हाच वृषलाधर्म आहे. मी तुमच्यापुढे ज्याचे वर्णन केले ते सर्व वृषल (चांडाळ) आहेत.

२१) कोणीही मनुष्य जन्माने वृषल होत नाही व जन्माने ब्राह्मण होत नाही. मनुष्य स्वतःच्या कर्मामुळे वृषल (चांडाळ) होतो (ठरतो) व स्वतःच्या कर्मामुळे ब्राह्मण होतो (ठरतो, सिध्द होतो)

२२) या संदर्भात मी एक उदाहरण देतो, त्यावरून तुम्ही ही बाब (सत्य) जाणून घ्या. सोपाक (कुत्र्याचे मांस खाणारा) नावाचा एक चाण्डाळपूत्र मातंग नावाने प्रसिध्द होऊन गेला.

सो यसं परमं पत्तो, मातङ्गोयं सुदुल्लभं,
आगच्छुं तस्सुपट्ठानं खत्तिया ब्राह्मणा बहू ।।२३।।

सो देवयानमारूय्ह विरजं सो महापथं,
कामरागं विराजेत्वा ब्रह्मलोकूपगो अहू ।।२४।।

न नं जाति निवारेसि, ब्रह्मलोकूपपत्तिया
अज्झायकाकुले जाता ब्राह्मणा मन्तबन्धुनो ।।२५।।

ते च पापेसु कम्मेसु अभिण्हमुपदिस्सरे,
दिट्ठेव धम्मे गारय्हा सम्पराये च दुग्गतिं,
न ते जाति निवारेति दुगच्चा गरहाय वा ।।२६।।

---

२३) तो मातंग (जातीचा मनुष्य) दुर्लभ असे यश (कीर्ती) प्राप्त करता झाला आणि पुष्कळ क्षत्रिय आणि ब्राह्मण त्याच्या सेवेसाठी उपस्थित झाले.

२४) तो मातंग कामसुखाच्या इच्छेने दमन करून निष्पाप अशा महान मार्गाचा अवलंब करून, स्वर्गीय विमान बसून ब्रह्मलोकास गेला.

२५) त्याच्या जातीने त्याला ब्रह्मलोकात जन्म घेतांना अडविले नाही. स्वाध्यायसंपन्न कुळात जन्मलेले कित्येक वैदिक ब्राह्मण पापकर्म करताना आढळतात.

२६) ते सुध्दा पाप कर्मापासून अलिप्त दिसत नाहीत. ते इहलोकी निन्दनीय होतात व परलोकात त्यांना दुर्गती प्राप्त होते. त्यांची जात (कूळ) त्यांना दूर्गतीपासून किंवा निन्देपासून त्यांचे रक्षण करीत नाही.

न जच्चा वसलो होति न जच्चा होति ब्राह्मणो,
कम्मना वसलो होति, कम्मना होति ब्राह्मणोति ।।२७।।

एवं वुत्ते अग्गिकभारद्वाजो ब्राह्मणो भगवन्तं एतदवोचः- अभिक्कन्तं भो गोतम, अभिक्कन्तं भो गोतम, सेय्यथापि भो गोतम निक्कुज्जितं वा उक्कुज्जेय्य पटिच्छन्नं वा विवरेय्य मूल्हस्स वा मग्गं अचिक्खेय्य, अन्धकारे वा तेलपज्जोतं धारेय्य चक्खुमन्तो रूपानि दक्खिन्तिति, एवमेव भोता गोतमेन अनेकपरियायेन धम्मो पकासितो, एसाहं भवन्तं गोतमं सरणं गच्छामि धम्मञ्च भिक्खुसङ्घम्च, उपासकं मं भवं गोतमो धारेतु अज्जतग्गे पाणुपेतं सरणं गतन्ति ।

---

२७) माणूस जन्माने वृषल (चांडाळ) होत नाही व जन्माने ब्राह्मण होत नाही. माणूस स्वतःच्या कर्माने चांडाळ व स्वतःच्या कर्माने ब्राह्मण होतो.

असे बोलल्यावर अग्निकभारद्वाज ब्राह्मण भगवंताला म्हणाला, ''भो, गौतम फारच छान ! भो गौतम, फारच सुंदर ! असे पालथे घातलेले भांडे उलथे करावे किंवा झाकलेली वस्तू उघडी करावी अथवा वाट चुकलेल्यास मार्ग दाखवावा किंवा डोळस लोकांना पदार्थ दिसावे म्हणून अंधारात मशाल पाजळावी , त्याचप्रमाणे आपण अनेक रितीने धर्म प्रकाशित केला आहे. हा मी भगवान गौतमाला, धर्माला आणि भिक्षुसंघाला शरण जातो. आजपासून जिवंत असेपर्यंत शरण गेलेला मी उपासक आहे असे स्विकारावे.

# २८ - सच्चविभङ्ग सुत्तं

एवं मे सुतं, एकं समयं भगवा बाराणसियं विहरति इसिपतने मिगदाये । तत्र को भगवा भिक्खु आमन्तेसि भिक्खवोति, भदन्ते ति ते भिक्खू भगवतो पच्चस्सोसुं । भगवा एतदवोच - तथागतेन भिक्खवे अरहता सम्मासम्बुध्देन बाराणसियं इसिपतने मिगदाये अनुत्तरं धम्मचक्कं पवत्तितं अप्पतिवत्तियं समणेन वा ब्राह्मणेन वा देवेन वा मारेन वा ब्रह्मुना वा केनचि वा लोकस्मिं, यदिदं चतुन्नं अरियसच्चानं आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मं । कतमेसं चतुन्नं ?

---

## २८. सत्यविभंगसूत्र (चार आर्यसत्ये)

मी असे ऐकले आहे की, एकदा भगवान बुध्द वाराणसीमध्ये ऋषिपतन मृगोद्यानात राहात असतांना त्यांनी भिक्षूला संबोधित करून म्हटले, भिक्षुंनो ! (ते ऐकून) भिक्षूंनी होय, भगवान (भन्ते), असे म्हणून प्रतिसाद दिला. तदनंतर भगवान म्हणाले, भिक्षूंनो, तथागत अरहन्त सम्यक् सम्बुध्दाने वाराणसीतील ऋषिपतन मृगोद्यानामध्ये अनुपम धर्मचक्र प्रवर्तित केले की जे धम्मचक्र श्रमण, ब्राह्मण, देवता, मार, ब्रह्मा किंवा दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीकडून या जगामध्ये आजपर्यंत प्रवर्तित होऊ शकले नाही. जसे की या चार आर्यसत्यांचे आख्यान (निरूपणा), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण भगवान बुध्दाने केले. कोणती चार आर्यसत्ये ?

**दुक्खस्स अरियसच्चस्स आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानिकम्मं ।**

**दुक्खसमुदयस्स अरियसच्चस्स आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मं ।**

**दुक्खनिरोधस्स अरियसच्चस्स आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मं .**

**दुक्खनिरोदगामिनीयापटिपदाय अरियसच्चस्स आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मं ।**

---

दुःख आर्यसत्याचे व्याख्यान (निरूपण), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण भगवान बुध्दाने केले.

दुःखसमुदय आर्यसत्याचे व्याख्यान (निरूपण), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण भगवान बुध्दाने केले.

दुःखनिरोध आर्यसत्याचे व्याख्यान (निरूपण), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण भगवान बुध्दाने केले.

दुःखनिरोधगामिनी मार्ग आर्यसत्याचे आख्यान (निरूपण), उपदेश , प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकण भगवान बुध्दाने केले.

**तथागतेन भिक्खवे अरहता सम्मासम्बुध्देन बाराणसियं इसिपतने मिगदाये अनुत्तरं धम्मचक्कं पवत्तितं अप्पतिवत्तियं समणेन वा ब्राह्मणेन वा देवेन वा मारेन वा ब्रह्मुना वा केनचि वा लोकस्मिं, यदिदं इमेसं चतुन्नं अरियसच्चानं आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मं ।**

**सेवेथ, भिक्खवे, सारिपुत्तमोग्गोलाने, पण्डिता भिक्खू अनुग्गाहका सब्रह्मचारीनं , सेय्यथापि भिक्खवे जनेत्ति, एवं सारिपुत्तो, सेय्यथापि जातस्स आपादेता एवं मोग्गल्लानो सारिपुत्तो भिक्खवे सोतापत्तिफले विनेति, मोग्गल्लानो उत्तमत्थे विनेति ।**

---

भिक्षुंनो, तथागत अरहन्त सम्यक् सम्बुध्दाने वाराणसीतील ऋषिपतन मृगोद्यानामध्ये अनुपम धम्मचक्र प्रवर्तित केले की जे धम्मचक्र श्रमण, ब्राह्मण, देवता, मार, ब्रह्मा किंवा दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीकडून या जगामध्ये उलट फिरविले जाऊ शकत नाही. (किंवा जे धम्मचक्र यापूर्वी श्रमण, ब्राह्मण, देवता, मार, ब्रह्मा, किंवा दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीकडून या जगामध्ये आजपर्यंत प्रवर्तित होऊ शकले नाही) जसे की, ह्या चार आर्यसत्यांचे आख्यान (निरूपण), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण भगवान बुध्दाने केले.

भिक्षुंनो, सारिपुत्र व मौद्गल्यायन यांनी तुम्ही सेवा (आदर-सत्कार) करा व अनुसरण करा. भिक्षुंनो, सारिपुत्र व मौद्गल्यायन पंडित आहेत व त्याचा आपल्या परिवारात राहणाऱ्या इतर सहब्रह्मचारी भिक्षूंवर अनुग्रह आहे.

**सारिपुत्तो, भिक्खवे, पहोति चत्तारि अरियसच्चानि वित्थारेन आचिक्खितुं देसेतुं पञ्ञपेतुं पट्ठपेतुं विवरितुं विभजितुं उत्तानिकातुन्ति । इदमवोच भगवा, इदं वत्वा सुगतो उट्ठायासना विहारं पाविसि ।**

**तत्र खो आयस्मा सारिपुत्तो अचिरपक्कन्तस्स भगवतो भिक्खू आमन्तेसि आवुसो भिक्खवोति । आवुसोति खो ते भिक्खू आयस्मतो सारिपुत्तस्स पच्चस्सोसुं । आयस्मा सारिपुत्तो एतदवोच, तथागतेन आवुसो अरहता सम्मासम्बुध्देन बाराणसियं इसिपतने मिगदाये अनुत्तरं धम्मचक्कं पवत्तितं अप्पतिवत्तियं समणेन वा ब्राह्मणेन वा देवेन वा मारेन वा ब्रह्मुना वा केनचि वा लोकस्मिं । यदिदं चतुन्नं अरियसच्चानं आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मं, कतमेसं चतुन्नं ?**

---

भिक्षुंनो, सारिपुत्र जन्मदात्या पित्यासारखा आहे व जन्मलेल्याला पोषणाऱ्या मातेसारखा मौद्‌गल्यायन आहे. भिक्षुंनो, सारिपुत्र योग्यताप्राप्त अभिभावकाला श्रोतापत्तीची अवस्था प्राप्त करण्यास मदत करतो आणि मौद्‌गल्यायन योग्यताप्राप्त अभिभावकाला निर्वाणपद प्राप्त करण्यास मदत करतो. भिक्षुंनो, सारिपुत्र चार आर्य सत्यांचे विस्तारपूर्वक आख्यान (निरूपण), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण करू शकतो. भगवान असे म्हणाले. असे म्हणून सुगत (बुध्द) आसनावरून उठून विहारात निघून गेले.

तेव्हा भगवान निघून गेल्यावर थोड्याच वेळाने आयुष्यमान सारिपुत्तांनी भिक्षुंना सम्बोधित केले. आयुष्यमान भिक्षुंनो, आयुष्यमान, असे म्हणून त्या भिक्षुंनी आयुष्यमान सारिपुत्तांना उत्तर दिले. आयुष्यमान सारिपुत्त म्हणाले. आयुष्यमानांनो, तथागत अरहन्त सम्यक् सम्बुध्दाने वाराणसीतील ऋषिपतन मृगोद्यानामध्ये अनुपम धम्मचक्र प्रवर्तित केले की जे धम्मचक्र श्रमण, ब्राह्मण, देवता, मार, ब्रह्मा किंवा दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीकडून या जगामध्ये ुलट फिरविले जाऊ शकत नाही. (किंरवा जे धम्मचक्र यापूर्वी श्रमण, ब्राह्मण, देवता, मार, ब्रह्मा, किंवा दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीकडून या जगामध्ये आजपर्यंत प्रवर्तित होऊ शकले नाही) जसे की, ह्या चार आर्यसत्यांचे आख्यान (निरूपण), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण भगवान बुध्दाने केले. कोणती चार आर्यसत्ये ?

**दुक्खस्स अरियसच्चस्स आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मं ।**

**दुक्खसमुदयस्स अरियसच्चस्स आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मं ।**

**दुक्खनिरोधस्स अरियसच्चस्स आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मं ।**

**दुक्खनिरोधगामिनीयापटिपदाय अरियसच्चस्स आचिक्खना देसना पञ्ञ पना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मं ।**

**कतमञ्चावुसो दुक्खं अरियसच्चं ? जातिपि दुक्खा जरापि दुक्खा व्याधिपि दुक्खा मरणम्पि दुक्खं सोकपरिदेव दुक्ख दोमनस्सुपायासातम्पि दुक्खा यम्पिच्छं न लभति तम्पि दुक्खं, सङ्खित्तेन पञ्चुपादानक्खन्धा दुक्खा ।**

---

दुःख आर्यसत्याचे आख्यान (निरूपण), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण भगवान बुध्दाने केले.

दुःखसमुदय आर्यसत्याचे आख्यान (निरूपण), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण भगवान बुध्दाने केले.

दुःखनिरोध आर्यसत्याचे आख्यान (निरूपण), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण भगवान बुध्दाने केले.

दुःखनिरोधगामिनी मार्ग आर्यसत्याचे आख्यान (निरूपण), उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण भगवान बुध्दाने केले.

काय आहे बन्धुंनो, दुःख आर्यसत्य ? जन्मसुध्दा दुःख आहे. जरा (वृध्दत्व) सुध्दा दुःख आहे, रोगसुध्दा दुःख आहे, मृत्युसुध्दा दुःख आहे, शोक, रडणे - ओरडणे (आक्रोश), पीडित होणे, चिंतीत होणे (मनस्ताप), त्रस्त होणे (चित्तप्रकोप) सुध्दा दुःख आहे. संक्षिप्तपणे पाच उपादान स्कंध दुःख आहेत.

**कतमा चावुसो जाति ? या तेसं तेसं तेसं सत्तानं तम्हि तम्हि सत्तनिकाये जाति सञ्जाति ओक्कन्ति अभिनिब्बत्ति खन्धानं पातुभावो आयातनानं पटिलाभो, अयं वुच्चतावुसो जाति ।**

**कतमा चावुसो, जरा ? या तेसं सत्तानं तम्हि तम्हि सत्तनिकाये जरा जीरणता खण्डिच्चं फालिच्चं वलित्तचता आयुनो संहानि इन्द्रियानं परिपाको, अयं वुच्चतावुसो जरा ।**

**कतमा चावुसो मरणं ? या तेसं तेसं सत्तानं तम्हा तम्हा सत्तनिकाया चुति चवनता भेदो अन्तरधानं मच्चुमरणं कालकिरिया खन्धानं भेदो कलेबरस्स निक्खेपो इदं वुच्चतावुसो मरणं ।**

---

बन्धुंनो, जन्म होणे म्हणजे काय ? कोणत्याही प्राणिमात्राचा निरनिराळ्या योनीत जन्म होणे, उगम पावणे, उतरणे, उत्पन्न होणे, इंद्रियाची उपलब्धी होणे. यालाच बन्धुंनो, जन्म होणे असे म्हणतात.

बन्धुंनो, म्हातारपण (जरा) म्हणजे काय ? निरनिराळ्या योनीत जन्मलेल्या प्राणिमात्रांना वृध्दत्व येणे, (वृध्दत्वामुळे) त्यांचे दात पडणे, केस पिकणे, त्वचेवर सुरकुत्या पडणे, आयुष्याचा अंतकाळ येणे, इंद्रिये दुर्बल होणे, यालाच बन्धुंनो, म्हातारपण असे म्हणतात.

बन्धुंनो, मरण कशाला म्हणतात ? निरनिराळ्या योनीत जन्मलेल्या प्राणिमात्रांचे निर्माल्य होणे, गळुन पडणे, पृथक् होणे, अंतर्धान पावणे, मृत्यू पावणे, काळात नष्ट होणे, स्कंध निरनिराळे होणे, शरीर टाकणे, यालाच बन्धुंनो, मरण असे म्हणतात.

**कतमो चावुसो, सोको ? यो खो, आवुसो, अञ्ञतरञ्ञतरेन व्यसनेन समन्नागतस्स अञ्ञतरञ्ञतरेन दुक्खधम्मेन फुट्ठस्स सोको सोचना सोचितत्तं अन्तोसोको अन्तोपरिसोको, अयं वुच्चतावुसो सोको ।**

**कतमो चावुसो, परिदेवो ? यो खो, आवुसो अञ्ञतरञ्ञतरेन ब्यसनेन समन्नागतस्स अञ्ञतरञ्ञतरेन दुक्खधम्मेन फुट्ठस्स आदेवो परिदेवो आदेवना परिदेवना आदेवितत्तं परिदेवितत्तं, अयं वुच्चतावुसो परिदेवो ।**

**कतमञ्चावुसो दुक्खं ? यं खो, आवुसो, कायिकं दुक्खं कायिकं असातं कायसम्फस्सजं दुक्खं असातं वेदयितं इदं वुच्चतावुसो दुक्खं ।**

**कतमञ्चावुसो, दोमनस्सं ? यं खो आवुसो चेतसिकं दुक्खं चेतसिकं असातं मनोसम्फस्सजं दुक्खं असातं वेदयितं इदं वुच्चतावुसो दोमनस्सं ।**

---

बन्धुंनो, शोक म्हणजे काय ? बन्धुंनो, काही ना काही विपत्ती असल्यामुळे, काही ना काही पीडा आल्यामुले, पीडित (मनुष्य) शोक करतो, चिंतित होतो, शोकावस्था, विव्हल होतो, विव्हलावस्था. यालाच बन्धुंनो शोक असे म्हणतात.

बन्धुंनो, रडणे-ओरडणे म्हणजे काय ? बन्धुंनो, काही न काही विपत्तीमुळे, काही ना काही पीडेमुळे मनुष्य रडतो. ओरडतो, (त्रागा करतो) रडण्याची अवस्था, ओरडण्याची अवस्था, आक्रोशावस्था, यालाच बन्धुंनो, रडणे - ओरडणे (आक्रोश) म्हणतात.

बन्धुंनो, पीडित होणे कशाला म्हणतात ? बन्धुंनो, हे जे शारीरिक दुःख आहे, शारीरिक पीडा आहे, शरीरसंबंध क्लेश आहेत, शरीराचे दुःख अनुभवणे आहे यालाच बन्धुंनो, पीडित होणे असे म्हणतात.

बन्धुंनो, चिंतित (मनस्ताप) होणे म्हणजे काय ? बन्धुंनो, जे मानसिक दुःख आहे, मानसिक पीडा आहे, मनासंबंधी क्लेश आहेत, मनाची दुःखद अनुभूती आहे. यालाच बन्धूंनो, चिंतित होणे (मनस्पात होणे) असे म्हणतात.

**कतमो चावुसो, उपायासो ? यो खो आवुसो अञ्ञतरञ्ञतरेन व्यसनेन समन्नागतस्स अञ्ञतरञ्ञतरेन दुक्खधम्मेन,फुट्ठस्स आयासो उपायासो आयासितत्तं उपायासितत्तं, अयं वुच्चतावुसो उपायासो ।**

**कतमञ्चावुसो, यम्पिच्छं न लभति तम्पि दुक्खं ? जाति धम्मानं आवुसो सत्तानं एवं इच्छा उप्पज्जति, अहो वत मयं न जातिधम्मा अस्साम न च, वत, नो जाति आगच्छेय्याति । न खो पनेतं इच्छाय पत्तब्बं, इदम्पि यम्पिच्छं न लभति तम्पि दुक्खं ।**

**जराधम्मानं आवुसो सत्तानं एवं इच्छा उप्पज्जति, अहो वत मयं न जराधम्मा न अस्साम न च वत नो जरा आगच्छेय्याति, न खो पनेतं इच्छाय पत्तब्बं, इदम्पि - यम्पिच्छ न लभति तम्पि दुक्खं .**

---

बन्धूंनो, त्रस्त (चित्तप्रकोप) होणे म्हणजे काय । बन्धुंनो, काही न काही विपत्तीमुळे, काही न काही दुःखामुळे, दुःखी मनुष्य हैराण होतो, चिडचिडा होतो, हैराण अवस्था, चिचिडी अवस्था, यालाच बन्धुंनो त्रस्त (चित्तप्रकोप) होणे असे म्हणतात.

बन्धुंनो, इच्छेचीपूर्ती न होणे हे दुःख कसे ? बन्धुंनो, जन्म झालेल्यांची अशी इच्छा असते - अहो, खरोखर, आम्ही जन्माला आलो नसतो तर बरे झाले असते. खरोखर आम्ही जन्माला येऊ नये. परंतु हे इच्छेने प्राप्त होत नाही. ह्याला म्हणतात आपण ज्याची इच्छा करतो ते मिळत नाही, हे दुःख आहे.

बन्धुंनो, वृध्द माणसांची इच्छा अशी असते - ‘अहो, खरोखर आम्हाला वृध्दत्व येऊ नये. खरोखर आम्ही वृध्द होऊ नये. परंतु हे इच्छेने प्राप्त होत नाही. जे (आपण) इच्छितो ते मिळत नाही, हे दुःख आहे.

**व्याधिधम्मानं आवुसो सत्तानं एवं इच्छा उप्पज्जति, अहो वत मयं न व्याधिधम्मा अस्साम न च वत नो व्याधि आगच्छेय्याति । न खो पनेतं इच्छाय पत्तब्बं । इदम्पि यम्पिच्छं न लभति तम्पि दुक्खं ।**

**मरणधम्मानं आवुसो सत्तानं एवं इच्छा उप्पज्जति, अहो वत मयं न मरणधम्मा अस्साम न च वत नो मरणं आगच्छेय्याति । न खो पनेतं इच्छाय पत्तब्बं । इदम्पि यम्पिच्छं न लभति तम्पि दुक्खं ।**

**सोकपरिदेवदुक्खदोमनस्सुपायासधम्मानं आवुसो सत्तानं एवं इच्छा उप्पज्जति, अहो वत मयं न सोकपरिदेवदुक्खदोमनस्सुपायासधम्मा अस्साम न च वत नो सोकपरिदेवदुक्खदोमनस्सुपायासा आगच्छेय्युन्ति, न खो पनेतं इच्छाय पत्तब्बं । इदम्पि यम्पिच्छं न लभति तम्पि दुक्खं ।**

---

बन्धुंनो, रोगपीडित माणसांची अशी इच्छा असते - अहो, खरोखर आपल्याला रोग पिडा होऊ नये. आम्हाला खरोखर रोग पिडा येऊ नये. परंतु हे इच्छेने प्राप्त होत नाही. जे (आपण) इच्छितो ते मिळत नाही, हे दुःख आहे.

बन्धुंनो, मरणोन्मुख माणसांची अशी इच्छा असते - अहो, खरोखर आपण मरणाधीन होऊ नये. (आपले मरण होऊ नये) खरोखर आपल्याला मरण येऊ नये. परंतु हे इच्छेने प्राप्त होत नाही. जे (आपण) इच्छितो ते मिळत नाही, हे दुःख आहे.

बन्धुंनो, शोकाकुल, रडणारे - ओरडणारे, पीडित, चिंताग्रस्त, त्रस्त माणसांची अशी इच्छा असते - अहो, खरोखर आपल्याला शोक होऊ नये, रडावे - ओरडावे (आक्रोश) लागू नये. आपल्याला शारीरिक क्लेश होऊ नयेत. आपल्याला मानसिक दुःख (चित्तसंताप प्राप्त होऊ नये), आपणांस मनाचा उद्वेग व उद्रेक (त्रस्तपणा) प्राप्त होऊ नये. अहो! खरोखर शोक, रडणे ओरडणे (आक्रोश) शारीरिक पीडा, मानसिक दुःख, मनाचा उद्वेग (त्रस्तपणा) आपल्याला येऊ नयेत. परंतु हे इच्छेने प्राप्त होत नाही. अशा तऱ्हेने जे (आपण) इच्छितो ते मिळत नाही, हे दुःख आहे.

**कतमा चावुसो, सङ्खित्तेन पञ्चुपादनक्खन्धा दुक्खा ? सेय्यथीदं, रूपुपादानक्खन्धो, वेदनुपादानक्खन्धो, सङ्खारूपादानक्खन्धो, सञ्ञूपादानक्खन्धो, विञ्ञाणुपादानक्खन्धो इमे वुच्चन्तावुसो सङ्खित्तेन पञ्चुपादानक्खन्धा दुक्खा', इदं वुच्चतावुसो दुक्खं अरियसच्चं।**

**कतमञ्चावुसो, दुक्खसमुदयं अरियसच्चं ? यायं तण्हा पोनोब्भविका नन्दिरागसहगता तत्रतत्रभिनन्दिनी, सेय्यथीदं, कामतण्हा भवतण्हा इदं वुच्चतावुसो दुक्खसमुदयं अरियसच्चं।**

**कतमञ्चावुसो, दुक्खनिरोधं अरियसच्चं ? यो तस्सायेव तण्हाय असेस विरागनिरोधो चागो पटिनिस्सग्गो मुत्ति अनालयो, इदं वुच्चतावुसो दुक्खनिरोधं अरियसच्चं ।**

---

बन्धुंनो, संक्षेपाने कोणते पाच उपादानस्कंद दुःख आहेत ? उदाहरणार्थ, रूप उपादान स्कंध, वेदना उपादान स्कंध, संज्ञा उपादान स्कंध, संस्कार उपादान स्कंध, विज्ञान उपादान स्कंध बन्धुंनो, ह्यालाच थोडक्यात पाच उपादान स्कंध दुःख म्हणतात. बन्धुंनो, याला म्हणतात दुःख आर्यसत्य.

काय आहे बन्धुंनो, दुःखसमुदाय आर्यसत्य ?

बन्धुंनो, ही पुनः पुन्हा उत्पन्न होणारी, लोभ आणि विकाराने युक्त असलेली, संसारात जेथे तेथे रममाण होणारी तृष्णा, उदाहरणार्थ, कामतृष्णा, भवतृष्णा आणि विभवतृष्णा, ह्याला बन्धुंनो, दुःखसमुदाय आर्यसत्य म्हणतात.

त्या तृष्णेविषयी संपूर्ण वैराग्य, त्या तृष्णेचा निरोध (नाश), त्याग, परित्याग,

**कतमञ्चावुसो, दुक्खनिरोधगामिनी पटिपदा अरियसच्चं ? अयमेव अरियो अट्ठङ्गिको मग्गो, सेय्यथीदं ? सम्मादिट्ठी सम्मासङ्कप्पो सम्मावाचा सम्माकम्मन्तो सम्माआजीवो सम्मावायामो सम्मसति सम्मासमाधि ।**

**कतमा चावुसो, सम्मादिट्ठी ?**

**यं खो, आवुसो दुक्खे ञाणं दुक्खसमुदये ञाणं दुक्खनिरोधे ञाणं दुक्खनिरोधगामिनिया पटिपदाय ञाणं, अयं वुच्चतावुसो सम्मादिट्ठि ।**

**कतमो चावुसो, सम्मासङ्कपो ? ।**

**नेक्खम्मसङ्कप्पो अव्यापादसङ्कप्पो अविहिंसासङ्कप्पो अयं वुच्चतावुसो सम्मासङ्कप्पो ।**

---

बन्धुंनो, दुःखनिरोधगामिनी मार्ग आर्यसत्य कोणते आहे ?

हाच तो आर्य अष्टांगिक मार्ग, उदाहरणार्थ, सम्यक दृष्टी, सम्यक् संकल्प, सम्यक् वाणी, सम्यक् कर्मात, सम्यक् आजीविका, सम्यक् व्यायाम्, सम्यक् स्मृती, सम्यक् समाधी.''

बन्धुंनो, सम्यक् दृष्टी काय आहे ?

बन्धुंनो, जे काही दुःखासंबंधी ज्ञान, दुःखसमुदायासंबंधी ज्ञान, दुःखनिरोधासंबंधी ज्ञान, दुःखनिरोधनाकडे घेऊन जाणाऱ्या मार्गाचे ज्ञान, ह्याला बन्धुंनो, सम्यक् दृष्टी म्हणतात.

बन्धुंनो, सम्यक संकल्प काय आहे ?

बन्धुंनो, नैष्काम्य (वैराग्य-संन्यस्तवृत्ती) संकल्प, अव्यापाद (द्वेषरहित) संकल्प

कतमा चावुसो, सम्मावाचा ?

मुसावदा वेरमणी, पिसुणा वाचा वेरमणी फरूसा वाचा वेरमणी सम्फप्पलापा वेरमणी, अयं वुच्चतावुसो सम्मावाचा।

कतमो चावुसो, सम्माकम्मन्तो ?

पाणातिपाता वेरमणी अदिन्नादाना वेरमणी कामेसु मिच्छाचारा वेरमणी, अयं वुच्चतावुसो सम्माकम्मन्तो ।

कतमो चावुसो, सम्माआजीवो ?

इधावुसो अरियसावको मिच्छाआजीवं पहाय सम्माआजीवेन जीविकं कप्पेति, अयं वुच्चतावुसो सम्माआजीवो ।

---

बन्धुंनो, सम्यक् वाणी म्हणजे काय ?

बन्धुंनो, खोटे बोलण्यापासून विरत (निवृत्त) राहणे, चहाडी चुगली करण्यापासून विरत राहणे, कठोर भाषणापासून विरत (अलिप्त) राहणे, निरर्थक बोलण्यापासून विरत राहणे, यालाच बन्धुंनो, सम्यक् वाणी म्हणतात.

बन्धुंनो, सम्यक् कर्मात काय आहे ?

जीवहिंसेपासून विरत (अलिप्त) राहणे, चोरीपासून विरत राहणे, कामोपभोगाच्या मिथ्याचारापासून विरत राहणे, याला बन्धुंनो, सम्यक् कर्मात म्हणतात.

बन्धुंनो, सम्यक् आजीविका आहे ?

बन्धुंनो, आर्यश्रावक मिथ्या (निषिध्द) आजीविकेला सोडून सम्यक् आजीविकेने आपला चरितार्थ चालवितो. बन्धुंनो, याला सम्यक् (विहित) आजीविका असे म्हणतात.

कतमा चावुसो, सम्मावायामो ?

इधावुसो भिक्खु अनुप्पन्नानं पापकानं अकुसलानं धम्मानं अनुप्पादाय छन्दं जनेति वायमति विरियं आरभति चित्तं पग्गण्हाति पदहति, उप्पन्नानं पापकानं अकुसलानं धम्मानं पहानाय छन्दं जनेति वायमति विरियं आरभति चित्तं पग्गण्हाति, पदहति, अनुप्पन्नानं कुसलानं धम्मानं उप्पादाय छन्दं जनेति वायमति विरियं आरभति चित्तं पग्गण्हाति पदहति । उप्पन्नानं कुसलानं धम्मानं ठितिया असम्मोसाय भिय्योभावाय वेपुल्लाय भावनाय पारिपूरिया छन्दं जनेति वायमति विरियं आरभति चित्तं पग्गण्हाति पदहति, अयं वुच्चतावुसो सम्मावायामो ।

---

बन्धुंनो, सम्यक् व्यायाम काय आहे ?

बन्धुंनो, भिक्षु उत्पन्न न झालेले पापक अकुशल धर्म उत्पन्न होऊ नयेत असी इच्छा धरतो, प्रयत्न करतो, वीर्यरंभ करतो, चित्त दृढ करतो आणि झटतो. उत्पन्न झालेले पापक अकुशल धर्म टाकून देण्याची इच्छा करतो, त्यासाठी प्रयत्न करतो, वीर्यरंभ करतो, चित्त दृढ करतो आणि झटतो. त्याचप्रमाणे उत्पन्न न झालेले कुशल धर्म उत्पन्न व्हावेत असी इच्छा धरतो, त्यासाठढी प्रयत्न करतो, वीर्यरंभ करतो, चित्त दृढ करतो आणि झटतो. उत्पन्न झालेले कुशल धर्म कायम रहावेत, पुसून जाऊ नयेत, वृध्दिंगत व्हावेत, विपुल व्हावेत, त्यांची भावना व्हावी, ते परिपूर्ण व्हावेत अशी इच्छा धरतो, त्यासाठी प्रयत्न करतो, वीर्यरंभ करतो, चित्त दृढ करतो व झटतो. यास बन्धूनो, सम्यक् व्यायाम म्हणतात.

कतमा चावुसो, सम्मासति ?

इधावुसो, भिक्खु काये कायानुपस्सी विहरति आतापि सम्पजानो सतिमा विनेय्य लोके अभिज्झादोमनस्सं, वेदनासु वेदनानुपस्सी विहरति आतापि सम्पजानो सतिमा विनेय्य लोके अभिज्झादोमनस्सं, चित्ते चित्तानुपस्सी विहरति आतापि सम्पजानो सतिमा विनेय्य लोके अभिज्झादोमनस्सं, धम्मेसु धम्मानुपस्सी विहरति आतापि सम्पजानो सतिमा विनेय्य लोके अभिज्झादोमनस्सं, अयं वुच्चतावुसो सम्मासति ।

---

बन्धुनो, सम्यक् स्मृती म्हणजे काय ?

बन्धुनो, भिक्षू शरीराकडे शरीर या दृष्टीने पाहतो. त्याचप्रमाणे तो उद्योगी, जागृत व स्मृतिमान होऊन लोभ व दुःख टाकून देऊन या जगात विहार करतो. भिक्षू वेदनाकडे वेदना या दृष्टीने पाहतो. त्याचप्रमाणे तो उद्योगी, जागृत व स्मृतिमान होऊन लोभ व दुःख टाकून देऊन या जगात विहार करतो. भिक्षू चित्ताकडे चित्त या दृष्टीने पाहतो. त्याचप्रमाणे तो उद्योगी, जागृत व स्मृतिमान होऊन लोभ व दुःख टाकून देऊन या जगात विहार करतो. भिक्षू धर्माकडे धर्म (मनाचे विषय) या दृष्टीने पाहतो. त्याचप्रमाणे तो उद्योगी, जागृत व स्मृतिमान होऊन लोभ व दुःख टाकून देऊन या जगात विहार करतो. भिक्षू धर्माकडे धर्म (मनाचे विषय) या दृष्टीने पाहतो. त्याचप्रमाणे तो उद्योगी, जागृत व स्मृतिमान होऊन लोभ र दुःख टाकून देऊन या जगात विहार करतो. याला बंधूनो, सम्यक् स्मृती म्हणतात.

कतमा चावुसो, सम्मासमाधि ?

**इधावुसो, भिक्खु विविच्चेव कामेहि विविच्च अकुसलेहि धम्मेहि सवितक्कं सविचारं विवेकजं पीतिसुखं पठमज्झानं उपसम्पज्ज विहरति, वितक्कविचारानं वुपसमा अज्झत्तं सम्पसादनं चेतसो एकोदिभावं अवितक्कं अविचारं समाधिजं पीतिसुखं दुतियज्झानं उपसम्पज्ज विहरति । पीतिया च विरागा उपेक्खको च विहरति सतो च सम्पजानो सुखं च कायेन पटिसंवेदेति यन्तं अरिया आचिक्खन्ति उपेक्खको सतिमा सुखविहारिति ततियज्झानं उपसम्पज्ज विहरति । सुखस्स च पहाना दुक्खस्स च पहाना पुब्बेव सोमनस्सदोमनस्सानं अत्थगमा अदुक्खं असुखं उपेक्खासतिपारिसुध्दिं चुतत्थज्झानं उपसम्पज्ज विहरति, अयं वुच्चतावुसो सम्मासमाधि, इदं वुच्चतावुसो दुक्खनिरोधगामिनीपटिपदा अरियसच्चं ।**

---

**बन्धुंनो, सम्यक् समाधी काय आहे ?**

बन्धुंनो, (समाधिमार्गात) भिक्षू हा कामसुखापासून (विषय सुखापासून) विन्मुख राहतो व दुष्कर्मापासून (अकुशल आचरणापासून) अलिप्त राहतो. पुढे वितर्क व विचार युक्त विवेकापासून उत्पन्न होणारा जो आनंद त्या आनंदाने युक्त होऊन प्रथम ध्यान साध्य करून विहार करतो. भिक्षू वितर्क व विचार शांत झाल्यावर आंतील प्रसन्नता व चित्ताची एकाग्रता ही प्राप्त करून वितर्कविचाररहित समाधीपासून प्राप्त झालेला प्रीतीसुखाचा अनुभव घेत द्वितीय ध्यान प्राप्त करून विहार करतो. प्रीती (प्रसन्नता) पासून विरक्त होऊन उपेक्षावान (उदासीन) होऊन स्मृतीमान व जागृत राहून शरीराने सुखाचा अनुभव घेत राहतो. याला पंडितजन 'उपेक्षावान, स्मृतिमान व सुखपुर्वक विहार करणारा' असे म्हणतात. हे तृतीय ध्यान साध्य करून तो याप्रमाणे विहार करतो. सुख व दुःख ही दोन्हीही सोडून दिल्याने व तत्पुर्वीच सौमनस्य (सुख) व दौर्मनस्य (दुःख) यांचा अस्त झाला असल्याने, त्या स्थितीत दुःखही राहात नाही व सुखही राहात नाही. फक्त उपेक्षा व स्मृती निवळून शुध्द स्थितीत राहते व त्याला चतुर्थध्यान प्राप्त होते व तो भिक्षू (साधक) जगात विहार करू लागतो. याला बन्धुंनो, सम्यक् समाधी म्हणतात.

याला बन्धुंनो, दुःखनिरोधगमिनी मार्ग आर्यसत्य म्हटले जाते.

तथागतेनाआवुसो, अरहता सम्मासम्बुध्देन बाराणसियं इसिपतने मिगदाये अनुत्तरं धम्मचक्कं पवत्तितं, अप्पतिवत्तियं समणेन वा ब्राह्मणेन वा देवेन वा मारेन वा ब्रह्मुना वा केनचि वा लोकस्मिं, यदिदंइमेसं चतुन्नं अरियसच्चानं आचिक्खना देसना पञ्ञपना पट्ठपना विवरणा विभजना उत्तानीकम्मन्ति। इदमवोचायस्मा सारिपुत्तो, अत्तमना ते भिक्खू आयस्मतो सारिपुत्तस्स भासितं अभिनन्दुन्ति ।

## २९.आटानाटिय सुत्तं (१)

अप्पसन्नेहि नाथस्स, सासने साधुसम्मते ।
अमनुस्सेहि चण्डेहि, सदा किब्बिसकारिभि ।।
परिसानं च तस्सन्नं, अहिंसाय च गुत्तिया ।
यं देसेसि महावीरो, परित्तं तं भणामहे ।।

---

बन्धुंनो, तथागत अर्हत सम्यक् सम्बुध्दांनी वाराणसी इसिपतन मृगदायात जे अनुपम धम्मचक्र प्रवर्तित केले की जे धम्मचक्र श्रमण, ब्राह्मण, देवता, मार ब्रह्मा किंवा दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीकडून या जगामध्ये उलट फिरविले जाऊ शकत नाही. (किंवा जे धम्मचक्र यापूर्वी श्रमण, ब्राह्मण, देवता, मार, ब्रह्मा किंवा दुसऱ्या कोणत्याही व्यक्तींकडून या जगामध्ये आजपर्यंत प्रवर्तित होऊ शकले नाही) ते म्हणाले, हे चार आर्यसत्यांचे आख्यान (निरूपण) उपदेश, प्रज्ञापन, प्रस्थापन, विवरण, विभाजन व स्पष्टीकरण केले आहे.

आयुष्यमान (आदरणीय) सारिपुत्तांनी हे म्हटले. संतुष्ट होऊन त्या भिक्षूंनी आयुष्यमान (आदरणीय) सारिपुत्तांच्या भाषणाचे अनुमोदन केले.

### २९. आटानाटिय सुत्र

भगवान बुध्दांच्या कल्याणकारक मानल्या जाणाऱ्या धर्मावर ज्या भयानक (भयंकर) व सदा पापकर्मे करण्यात मग्न अशा अमानुष्य प्राण्यांकडे (प्राण्याद्वारा), तसेच त्यांच्या समूहाद्वारा आचरल्या जाणाऱ्या हिंसेपासून रक्षण प्राप्त करण्यासाठी, महावीर भगवान बुध्दाने ज्या सुरक्षास्तोत्राचा (रक्षणमंत्राचा) उपदेश केला होता. त्याचे आम्ही पठन (संगायन) करीत आहोत.

एवं मे सुतं, एकं समयं भगवा राजगहे विहरति गिज्झकूटे पब्बते । अथ खो चत्तारो महाराजा, महतिया च यक्खसेनाय, महतिया च गन्धब्बसेनाय, महतिया च कुम्भण्डसेनाय, महतिया च नागसेनाय, चतुद्दिसं रक्खं ठपेत्वा, चतुद्दिस्सं गुम्बं ठपेत्वा, चतुद्दिसं ओवरणं ठपेत्वा, अभिक्कन्ताय रत्तिया अभिक्कन्तवण्णा केवलकप्पं गिज्झकूटं पब्बतं ओभासेत्वा येन भगवा तेनुपसङ्कमिंसु उपसङ्कमित्वा, भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं निसिदिंसु, ते पि खो यक्खा अप्पेकच्चे भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं निसीदिंसु, अप्पेकच्चे भगवता सध्दिं सम्मोदिंसु, सम्मोदनियं कथं साराणीयं वीतिसारेत्वा एकमन्तं निसीदिंसु, अप्पेकच्चे येन भगवा तेनञ्जलिं पणामेत्वा एकमन्तं निसीदिंसु, अप्पेकच्चे तुण्हीभूता एकमन्तं निसीदिंसु ।

---

असे मी ऐकले आहे की, एके समयी भगवान (बुध्द) राजगृहात ग्रृध्रकुट पर्वतावर राहात होते. तेव्हा चार महाराजे मोठी यक्षसेना, मोठी गंधर्वसेना, मोठी कुंभडसेना व मोठी नागसेना यासहित चारी दिशांस रक्षक, सैन्य व पहारेकरी ठेवून दैदिप्यमान रात्री दिप्तिमान होऊन सर्व ग्रृध्रकूट पर्वत (आपल्या तेजाने) प्रकाशित करून भगवंताकडे आले व त्यास अभिवादन करून एका बाजूस बसले. काही यक्षांनी भगवंतास अभिवादन केले व ते एका बाजूस बसले. काही यक्षांनी भगवंतास कुशलतेसंबंधी प्रश्न केले (विचारपूस केली). कुशलतेने प्रश्न विचारून झाल्यावर ते यक्ष एका बाजूस बसले. काही भगवंताच्या पुढे हात जोडून एका बाजूस बसले. काही आपले नाव व गोत्र सांगून एका बाजूस बसले व काही स्तब्ध राहून एका बाजूस बसले.

**एकमन्तं निसिन्नो खो वेस्सवणो महाराजा भगवन्तं एतदवोच - सन्ति हि भन्ते उलारा यक्खा भगवतो अप्पसन्ना, सन्ति हि भन्ते उलारा यक्खा भगवतो पसन्ना, सन्ति हि भन्ते मज्झिमा यक्खा भगवतो अप्पसन्ना, सन्ति हि भन्ते मज्झिमा यकखा भगवतो पसन्ना । सन्ति हि भन्ते नीचा यक्खा भगवतो अप्पसन्ना, सन्ति हि भन्ते नीचा यक्खा भगवतो पसन्ना, येभुय्येन खो पन भन्ते यक्खा अप्पसन्ना येव भगवतो, तं किस्स हेतु ?**

**भगवा हि भन्ते पाणातिपाता वेरमणिया धम्मं देसेति, अदिन्नादाना वेरमणिया धम्मं देसेति, कामेसुमिच्छाचारा वेरमणिया धम्मं देसेति, मुसावादा वेरमणिया धम्मं देसेति, सुरामेरयमज्जप्पमादट्ठाना वेरमिणया धम्मं देसेति, येभुय्येन खो पन भन्ते यक्खा अप्पटिविरता येव पाणातिपाता, अप्पटिविरता आदिन्नादाना, अप्पटिविरता कामेसुमिच्छाचारा, अप्पटिविरता मुसावादा, अप्पटिविरता सुरामेयमज्जपमादट्ठाना । तेसं तं होति अप्पियं अमनापं ,**

---

एका बाजूस बसून वेस्सवण महाराजा भगवंतास म्हणाला, 'भन्ते, काही मोठे यक्ष भगवंतावर अप्रसन्न आहेत. भन्ते, काही मोठे यक्ष भगवंतावर प्रसन्न आहेत. भन्ते, काही मध्यम यक्ष भगवंतावर अप्रसन्न आहेत. तर काही मध्यम यक्ष भगवंतावर प्रसन्न आहेत. भन्ते, काही लहान यक्ष भगवंतावर अप्रसन्न आहेत, असे का ?

भन्ते, भगवान प्राणघातापासून अलिप्त राहण्यासाठी धर्माचा उपदेस करतात. चौर्यकर्मापासून अलिप्त राहण्यासाठी धर्माचा उपदेश करतात, व्याभिचारापासून अलिप्त राहण्यासाठी धर्माचा उपदेश करतात, असत्या भाषणापासून अलिप्त राहण्यासाठी धर्माचा उपदेश करतात व मद्यपानापासून अलिप्त राहण्यासाठी धर्माचा उपदेश करतात. भन्ते, ह्या यक्षापैकी बहुतेक प्राणघातापासून अलिप्त राहण्यासाठी धर्माचा उपदेश करतात, चौर्यकर्मापासून अलिप्त नाहीत. व्यभिचारापासून अलिप्त नाहीत, असत्य भाषणापासून अलिप्त नाहीत व मद्यपानापासून अलिप्त नाहीत. म्हणून त्यास भगवंत अप्रिय व नापसंत आहेत.

**सन्ति हि भन्ते भगवतो सावका अरञ्ञे वनपत्थानि पन्तानि सेनासनानि पटिसेवन्ति अप्पसद्दानि अप्पनिग्घोसानि विजनवातानि मनुस्सराहसेय्यकानि पटिसल्ला न सारूप्पानि, तत्थ सन्ति उलारा यक्खा निवासिनो, ये इमस्मिं भगवतो पावचने अप्पसन्ना तेसं पसादाय, उग्गण्हातु भन्ते भगवा आटानाटियं रक्खं भिक्खूनं भिक्खुनीनं उपासकानं उपासिकानं गुत्तिया रक्खाय अविहिंसाय फासुविहारायाति। अधिवासेसि भगवा तुण्हीभावेन,**

**अथ खो वेस्सवणो महाराजा भगवतो अधिवासनं विदित्वा तायं वेलायं इमं आटानाटियं रक्खं अभासि :**

**विपस्सिस्स नमत्थु चक्खुमन्तस्स सिरीमतो,**
**सिखिस्सपि नमत्थु सब्बभूतानुकम्पिनो ।।१ ।।**

---

भन्ते, भगवंताचे श्लोक, अरण्यात येथे कोणताही आवाज होत नाही. निःशब्द, जेथे लोकांचे वारेही नाही, जेथे एकांतात राहता येईल व ध्यानास योग्य अशा दूर असलेल्या जागी राहतात. तेथे ज्यांना आपला उपदेश आवडत नाही असे मोठमोठे यक्ष राहतात. त्यांच्या परिवर्तनासाठी आणि भिक्षू, भिक्षुणी उपासक व उपासिका यांचे गोपन व रक्षण व्हावे, त्यांस कोणी त्रास देऊ नये व त्यांनी सुखाने वास करावा यासाठी भगवंताने आटानाटिय रक्षा द्यावी (शिकवावी). (आटानाटा नगरात असलेल्या सात बुध्दास अनुसरून रक्षणार्थ म्हटलेला मंत्र) भगवन्तांनी स्तब्ध राहून अनुमूर्ती दर्शविली.

नंतर भगवंताची अनुमती जाणून वेस्सवण महाराजा त्यावेळी पुढील आटानाटीय रक्षा म्हणू लागला -

चक्षुमान आदरणीय विपश्यी बुध्दाला आमचा नमस्कार असो! सर्व प्राणिमात्रांविषयी मनात अनुकम्पा, सहानुभूती बाळगणाऱ्या शिखिनामक बुध्दाला आमचा नमस्कार असो!

**वेस्सभुस्स नमत्थु नहातकस्स तपस्सिनो,**
**नमत्थुककुसन्धस्स मारसेनप्पमद्दिनो ।।२ ।।**

**कोणागमनस्स नमत्थु ब्राह्मणस्स वुसीमतो,**
**कस्सपस्स नमत्थु विप्पमुत्तस्स सब्बधि ।।३ ।।**

**अङ्गिरसस्स नमत्थु सक्यपुत्तस्स सिरीमतो,**
**यो इमं धम्मं देसेसि सब्बदुक्खापनूदनं ।।४ ।।**

**ये चापि निब्बुता लोके यथाभूतं विपस्सिसुं,**
**ते जना अपिसुणा महन्ता वीतसारदा ।।५ ।।**

**हितं देवमनुस्सानं यं नमस्सन्ति गोतमं,**
**विज्जाचरणसम्पन्नं महन्तं वीतसारदं ।।६ ।।**

---

स्नातक व तपस्वी विश्वभू बुध्दाला आमचा नमस्कार असो ! मारसेनेला छिन्नभिन्न करणाऱ्या ककुसन्ध बुध्दाला आमचा नमस्कार असो !

व्रतसम्पन्न ब्राह्मण कोणागमन बुध्दाला आमचा ननस्कार असो ! सर्व प्रकारे मुक्त अशा काश्यप बुध्दाला आमचा नमस्कार असो !

आदरणीय शाक्यपुत्र अंगीरस बुध्द, ज्याने सर्व दुःखाचा नाश करणाऱ्या धर्माचा उपदेश केला, त्याला आमचा नमस्कार असो !

यांच्याशिवाय अन्य, जे कोणी यथार्थ (यथातथ्य) ज्ञान संपादन करून ज्यांनी निर्वाण प्राप्त केले, त्या महान साधकांचा उपदेश तुम्ही दक्षतेने लक्षपूर्वक ऐका.

सर्व माणसे देव आणि मनुष्यांचा हितचिंतक व विद्याचरणसम्पन्न अशा महान व निर्भय गौतमाला वन्दन करतात.

**यतो उग्गच्छती सुरीयो आदिच्चो मण्डली महा,**
**यस्स चुग्गच्छमानस्स संवरीपि निरूज्झति ।।७।।**

**यस्स चुग्गते सुरिये, दिवसोति पवुच्चति**
**रहदोपि तत्थ गम्भीरो, समुद्दो सरितोदको ।।८।।**

**एवं नं तत्थ जानन्ति समुद्दो सरितोदको**
**इतो सा पुरिमा दिसा इति नं आचिक्खती जनो ।।९।।**

**यं दिसं अभिपालेति महाराजा यसस्सिसो**
**गन्धब्बानं अधिपति धतरट्ठो इति नामसो ।।१०।।**

**रमती नच्चगीतेहि गन्धब्बेहि पुरक्खतो**
**पुत्तापि तस्स बहवो एकनामाति मे सुतं ।।११।।**

---

जेथून अदितीचा पुत्र मंडलयुक्त व महान सूर्य उगवतो, जो उगवत असता रात्रीचा विनाश होतो व सूर्य उगवला असता दिवस असे म्हणतात.

तेथे जे खोल तळे आहे. ते नद्यांच्या पाण्याने भरलेला समुद्रच होय, असे लोक जाणतात.

ती ही पूर्व दिशा असे लोक सांगतात. त्या दिशेचे जो यशस्वी महाराजा रक्षण करितो.

तो गंधर्वाचा अधिपती असून त्याचे नाव धत्तरठ्ठ असे आहे. गंधर्वाबरोबर नृत्य व गीत यांमध्ये तो रमत असतो.

त्याचे एकाच नावाचे पुष्कळ पुत्र आहेत, असे मी ऐकले आहे. ते एक्याण्णवही मोठे बलवान असून त्यांचे नाव इंद्र असे आहे.

असीतिं दस एको च इन्दनामा महब्बला
ते चापि बुध्दं दिस्वान बुध्दं आदिच्चबन्धुनं ।।१२।।

दूरतोव नमस्सन्ति महन्तं वीतसारदं
नमो ते पुरिसाजञ्ञ नमो ते पुरिसुत्तम ।
कुसलेन समेक्खसि, अमनुस्सापि तं वन्दन्ति ।
सुतं नेतं अभिण्हसो, तस्मा एवं वदेमसे''
जिनं वन्दथ गोतमं जिनं वन्दाम गोतमं,
विज्जाचरणसम्पन्नं बुध्दं वन्दाम गोतमं ।।१३।।

येन पेता पवुच्चन्ति पिसुणा पिट्ठिमंसिका,
पाणातिपानितो लुद्दा चोरा नेकतिका जना, ।।१४।।

इतो सा दक्खिणा दिसा, इति नं आचिक्खती जनो ।
यं दिसं अभिपालेति महाराजा यसस्सिसो ।।१५।।

---

ते सुध्दा आदित्यबंधु महान व निर्भय बुध्दाला पासून दुरून नमस्कार करतात.

पुरूषश्रेष्ठा, तुला नमस्कार असो ! पुरूषोत्तमा, तुला नमस्कार असो ! तू आपल्या कुशल चक्षुने सर्वांकडे पाहतोस. अमनुष्यप्राणी देखील तुला वंदन करतात. आम्ही हे अनेकदा ऐकले आहे. म्हणून आम्ही असे म्हणतो. जिन (सर्वश्रेष्ठ) गौतमाला तुम्ही वंदन करा. जिन गौतमाला आम्ही वंदन करतो. विद्या व आचरण यांनी संपन्न अशा गौतमबुध्दाला आम्ही वंदन करतो.

जिकडे दुष्ट व चुगलखोर, प्राणघात करणारी, लोभी, चोर फसवेलोक असतात असे लोक समजतात ती ही दक्षिण दिशा असे लोक सांगतात. त्या दिशेचे जो यशस्वी महाराजा रक्षण करतो.

**कुम्भण्डानं आधिपति विरूल्हो इति नामसो ।**
**रमती नच्चगीतेहि, कुम्भण्डेहि पुरक्खतो ।।१६।।**

**पुत्तापि तस्स बहवो एकनामाति मे सुतं ।**
**असीतिं दस एको च इन्दनामा महब्बला ।।१७।।**

**ते चापि बुध्दं दिस्वान बुध्दं आदिच्चबन्धुनं,**
**दूरतोव नमस्सन्ति महन्तं वीतसारदं ।।**

**नमो ते पुरिसाजञ्ञ नमो ते पुरिसुत्तम,**
**कुसलेन समेक्खसि, अमनुस्सापि तं वन्दन्ति,**
**सुतं नेतं अभिण्हसो तस्मा एवं वदेमसे ।।**

**जिनं वन्दथ गोतमं जिनं वन्दाम गोतमं,**
**विज्जाचरणसम्पन्नं बुध्दं वन्दाम गोतमं ।।१८।।**

---

तो कुंभंडांचा अधिपती असून त्याचे नाव विरूळह असे आहे. कुंभंडाबरोबर नृत्य व गीत यामध्ये तो रमत असतो. त्याचे एकाच नावाचे पुष्कळ पुत्र आहेत असे मी ऐकिले आहे. ते एक्याण्णवही मोठे बलवान असून त्यांचे नाव इंद्र आहे.

ते सुध्दा आदित्यबंधु महान व निर्भय बुध्दाला पाहून दुरून नमस्कार करतात. पुरूषश्रेष्ठ तुला नमस्कार असो ! पुरूषत्तमा, तुला नमस्कार असो ! तू आपल्या कुशल चक्षूने सर्वांकडे पाहतोस. अमनुष्यप्राणी देखील तुला वंदन करतात. आम्ही हे अनेकदा ऐकले आहे. म्हणून आम्ही असे म्हणतो. जिन गौतमाला तुम्ही वंदन करा. जिन गौतमाला आम्ही वंदन करतो. विद्या व आचरण यांनी संपन्न अशा गौतमबुध्दाला आम्ही वंदन करतो.

**यत्थ चोग्गच्छति सुरियो, आदिच्चो मण्डली महा,**
**यस्स चोग्गच्छमानस्स, दिवसोपि निरूज्झति ।।१९।।**

**यस्स चोग्गते सुरिये, संवरीति पवुच्चति ।**
**रहदोपि तत्थ गम्भीरो समुद्दो सरितोदको ।।२० ।।**

**एवं नं तत्थ जानन्ति समुद्दो सरितोदको ।**
**इतो सा पच्छिमा दिसा इति नं आचिक्खती जनो ।**
**यं दिसं अभिपालेति महाराजा यसस्सिसो ।।२१ ।।**

**नागानं आधिपति विरूपक्खो इति नामसो,**
**रमती नच्चगीतेहि नागेहि पुरक्खतो ।।२२ ।।**

**पुत्तापि तस्स बहवो, एकनामा'ति मे सुतं,**
**असीतिं दस एको च, इन्दनामा महब्बला ।।२३ ।।**

---

जेथे अदितीचा पुत्र मंडलयुक्त व महान सूर्य अस्तास जातो. जो अस्तास जात असता दिवसाचा विनाश होतो व जो अस्तास गेला असता रात्र (झाली) असे म्हणतात.

तेथे जे खोल तळे आहे. ते नद्यांच्या पाण्याने भरलेला समुद्रच होय असे लोक जाणतात.

ती ही पश्चिम दिशा असे लोक सांगतात. त्या दिशेचे जो यशस्वी महाराजा रक्षण करतो.

तो नागाचा अधिपती असून त्येच नार विरूक्ख असे आहे. नागांबरोबर नृत्य व गीत यांमध्ये तो रमत असतो. त्याचे एकाच नावाचे पुष्कळ पुत्र आहेत असे मी ऐकले आहे. ते एक्याण्णवही मोठे बलवान असून त्यांचे नाव इंद्र असे आहे.

**ते चापि बुध्दं दिस्वान बुध्दं आदिच्चबन्धुनं,**
**दूरतोव नमस्सन्ति महन्तं वीतसारदं,**
**नमो ते पुरिसाजञ्ञ नमो ते पुरिसुत्तम,**
**कुसलेन समेक्खसि अमनुस्सापि तं वन्दन्ति ।**
**सुतं नेतं अभिण्हसो, तस्मा एवं वदेमसे,**
**जिनं वन्दथ गोतमं जिनं वन्दाम गोतमं,**
**विज्जाचरणसम्पन्नं बुध्दं वन्दाम गोतमं ।।२४।।**

**येन उत्तरकुरूरम्मा महानेरू सुदस्सनो,**
**मनुस्सा तत्थ जायन्ति अममा अपरिग्गहा ।।२५।।**

**न ते बीजं पवपन्ति नापि नीयन्ति नङ्गला,**
**अकट्ठपाकिमं सालिं परिभुञ्जन्ति मानुसा ।।२६।।**

**अकणं अथुसं सुध्दं सुगन्धं तण्डुलप्फलं,**
**तुण्डिकीरे पचित्वान ततो भुञ्जन्ति भोजनं ।।२७।।**

---

तो सुध्दा आदित्यबंधु महान व निर्भय बुध्दाला पाहून दूरून नमस्कार करतात.

पुरूषश्रेष्ठा, तुला नमस्कार असो ! पुरूषोत्तमा, तुला नमस्कार असो! तू आपल्या कुशल चक्षूने सर्वांकडे पाहतोस. अमनुष्यप्राणी (भूतखेते) देखील, तुला वंदन करतात. आम्ही हे अनेकदा ऐकले आहे. म्हणून आम्ही असे म्हणतो.

जिन गौतमाला तुम्ही वंदन करा. जिन गौतमाला आम्ही वंदन करतो. विद्या व आचरण यांनी संपन्न अशा गौतम बुध्दास आम्ही वंदन करतो.

जिकडे उत्तरकरू नावाच रम्य प्रदेश व महामेरू नावाचा सुंदर पर्वत आहे. तेथील मनुष्ये जन्मतःच निरिच्छ असून त्यांस परिग्रह मुळीच नसतो.

ते बी पेरीत नाहीत. तेथे नांगर फिरले जात नाहीत. तेथील मनुष्ये ज्यात कणकं नाहीत, ज्यावर फोल नाही, जे शुध्द व सुगंधी तांदूळ आहेत. दुधामध्ये शिजवून भोजन करतात. ते बिननांगरलेल्या जमिनीत झालेल्या साळी खाऊन राहतात. ते उखळीत शिजवून जेवण जेवतात.

**गाविं एकखुरं कत्वा अनुयन्ति दिसोदिसं,**
**पसुं एकखुरं कत्वा अनुयन्ति दिसोदिसं ।।२८।।**
**इत्थिवाहनं कत्वा अनुयन्ति दिसोदिसं,**
**पुरिसवाहनं कत्वा अनुयन्ति दिसोदिसं,**
**कुमारिवाहनं कत्वा अनुयन्ति दिसोदिसं,**
**कुमारवाहनं कत्वा अनुयन्ति दिसोदिसं ।**
**ते याने अभिरूहित्वा सब्बा दिसा अनुपरिय्यन्ति**
**पचारा तस्स राजिनो ।।३०।।**
**हत्थियानं अस्सयानं दिब्बंयानं उपट्ठितं ।**
**पासादा सिविका चेव महाराजस्स यसस्सिनो ।।**
**तस्स च नगरा अहू, अन्तलिक्खे सुमापिता ।**
**आटानाटा कुसिनाटा परकुसिनाटा,**
**नाटपुरिया परकुसिटनाटा,**
**उत्तरेन कपीवन्तो, जनोघमपरेन च,**
**नवनवतियो अम्बर अम्बरवतियो**
**आलकमन्दा नाम राजधानि ।।**

---

गाय हीस वाहन करून ते निरनिराळ्या दिशास जातात. पशु यांस वाहन करून ते निरनिराळ्या दिशास जातात. स्त्री हीस वाहन करून ते निरनिराळ्या दिशास जातात. पुरूष यांस वाहन करून ते निरनिराळ्या दिशास जातात. कुमारीस हिस वाहन करून ते निरनिराळ्या दिशांस जातात. कुमार यांस वाहन करून ते निरनिराळ्या दिशांस जातात.

त्या राजाचे नोकर यानात बसून निरनिराळ्या दिशास विहार करतात. त्या यशस्वी महाराजाची हस्तियान, अश्वयान, दिव्ययान, प्रासाद व शिविका ही याने होत.

त्यांची नगरे आकाशात वसलेली आहेत. आटानाटा, कुसिनाटा, परकुसिनाटा, नाटसुरिया, परकुसिटनाटा, उत्तरेस कसीवन्त, त्याच्या पलीकडे जनोघ, वननवतिय, अंबर, अंबरवतिय अलनंद नावाची राजधानी आहे.

**कुवेरस्स खो पन मारिस महाराजस्स**
**विसाणा नाम राजधानि,**
**तस्मा कुवेरो महाराजा वेस्सवणोति पवुच्चति, ।।**

**पच्चेसन्तो पकासेन्ति ततोला तत्तला ततोतला,**
**ओजसि तेजसि ततोजसि सूरो राजा अरिट्ठो नेमि, ।।**

**रहदोपि तत्थ धरणी नाम यतो मेघा पवस्सन्ति**
**वस्सा यतो पतायन्ति, सभापि तत्थ भगलवती नाम**
**यत्थ यक्खा पयिरूपासन्ति ।।३१ ।।**

**तत्थ निच्चफला रुक्खा । नानादिजगणायुता,**
**मयूरकोञ्चाभिरुदा कोकिलाभिहि वग्गुभि ।।३२ ।।**

---

मारिष (मित्रा) कुबेर महाराजाची विसाणा नावाची राजधानी आहे. म्हणून कुबेर महाराजास वेस्सवण असे म्हणतात.

वेगवेगळे राज्य करणारे दिप्तिमान असे हे यक्ष ततोला, तत्ला, ततोतला, ओजसी, तेजसी, ततोजसी, सूर, राजा, अरिट्ठ, नेमि आहेत.

तेथे एक धरणी नावाच तळे आहे. तेथून मेघ वर्षाव करितात. तेथून जिकडे तिकडे वृष्टी होते. त्याची भागलवत नावाची सभा आहे.

तेथे यक्ष जमतात. तेथील वृक्षास नेहमी फळे असतात. त्यावर नानाप्रकारच्या पक्ष्यांचे थवे बसलेले असतात. मयूर, क्रौंच, कोकिला, इत्यादी. ते मधूर स्वराने गायन करीत असतात.

जिवंजीवक सद्देत्थ, अथो ओट्ठवचित्तका,
कुकुत्थका कुलीरका वने पोक्खरसातका ॥३३॥

सुकसालिकासद्देत्थ दण्डमाणवकानि च,
सोभति सब्बकालं सा कुवेरनलिनी सदा ॥३४॥

इतो सा उत्तरा दिसा इति नं आचिक्खती जनो,
यं दिसं अभिपालेति महाराजा यसस्सिसो ॥३५॥

यक्खानं अधिपति कुवेरो इति नामसो,
रमती नच्चगीतेहि यक्खेहि पुरक्खतो ॥३६॥

पुत्तापितस्स बहवो एकनामाति मे सुतं,
असीतिं दस एको च, इन्दनामा महब्बला ॥३७॥

---

जीवंजीवक, ओट्ठचित्तक, कुक्कुटक, कुलीरक, वनातील पोक्खरसातक, शुक्र, सारिका, दण्डमाणवक इत्यादी पक्षांचे आवाज तेथे नेहमी ऐकू येतात. अशा तऱ्हेने ती कुवरेनलिनी नेहमी शोभत असते.

ती ही उत्तर दिशा असे लोक सांगतात त्या दिशेचे जो यशस्वी महाराजा रक्षण करतो.

तो यक्षांचा अधिपती असून त्यांचे नाव कुवेर असे आहे. यक्षाबरोबर नृत्य व गीत यामध्ये तो रमत असतो. त्याचे एकाच नावाचे पुष्कळ पुत्र आहेत असे मी ऐकले आहे. ते एक्याण्णवही मोठे बलवान असून त्यांचे नाव इंद्र असे आहे.

ते चापि बुध्दं दिस्वान, बुध्दं आदिच्चबन्धुनं,
दूरतो व नमस्सन्ति महन्तं वीतसारदं ।
नमो ते पुरिसाजञ्ञ नमो ते पुरिसुत्तम ।।

कुसलेन समेक्खसि अमनुस्सापि तं वन्दन्ति ।
सुतं नेतं अभिण्हसो तस्मा एवं वदेमसे ।।

जिनं वन्दथ गोतमं जिनं वन्दाम गोतमं,
विज्जाचरणसम्पन्नं बुध्दं वन्दाम गोतमंन्ति ।।

अयं खो सा मारिस आटानाटिया रक्खा भिक्खूनं भिक्खूनीनं उपासकानं उपासिकानं गुत्तिया रक्खाय अविहिंसाय फासुविहारायाति ।

---

ते सुध्दा आदित्यबंधु महान व निर्भय बुध्दाला पाहून दुरून नमस्कार करतात. पुरुषश्रेष्ठा, तुला नमस्कार असो ! पुरूषोत्तमा, तुला नमस्कार असो ! तू आपल्या कुशल चक्षूने सर्वांकडे पाहतोस. अमनुष्यप्राणी (भुतेखेते) देखील तुला वंदन करतात. आम्ही हे अनेकदा ऐकले आहे, म्हणून आम्ही असे म्हणतो. जिन गौतमाला तुम्ही वंदन करा. जिन गौतमाला आम्ही वंदन करतो. विद्या व आचरण यांनी संपन्न अशा गौतम बध्दाला आम्ही वंदन करतो. मारिष (मित्रा), भिक्षू, भिक्षुणी, उपासक व उपासिका यांचे गोपन व रक्षण व्हावे. त्यास कोणी त्रास देऊ नये व त्यांनी सुखाने वास करावा यासाठी ही आटानाटीय रक्षा आहे.

यस्स कस्सचि मारिस भिक्खुस्स वा भिक्खुनिया वा उपासकस्स वा उपासिकाय वा अयं आटानाटीया रक्खा सुग्गहिता भविस्सति समत्ता परियापुता, तञ्चे अमनुस्सो यक्खो वा यक्खिनी वा यक्खपोतको वा यक्खपोतिका वा यक्खमहामत्तो वा यक्खपारिसज्जो वा यक्खपचारो वा, गन्धब्बो वा गन्धब्बी वा गन्धब्बपोतको वा गन्धब्बपोतिका वा गन्धब्बमहामत्तो वा गन्धब्बपारिसज्जो वा गन्धब्बपचारो वा, कुम्भण्डो वा कुम्भण्डी वा कुम्भण्डपोतको वा कुम्भण्डपोतिका वा कुम्भण्डमहामत्तोवा कुम्भण्डपरिसज्जोवा कुम्भण्डपचारो वा, नागो वा नागीनी वा नागपोतको वा नागपोतिका वा नागमहामत्तो वा नागपरिसज्जो वा नागपचारो वा पदुपट्ठचितो गच्छन्तं वा अनुगच्छेय ठितं वा उपतिट्ठेय्य निसिन्नं वा उपनिसीदेय्य निपन्नं वा उपनिपज्जेय्य ।

---

मारिष (मित्रा), जो कोणी भिक्षू, भिक्षूणी, उपासक अथवा उपासिका ही आटानाटीय रक्षा नीट शिकेल व संपूर्ण ग्रहण करील तो भिक्षू, भिक्षूणी, उपासक अथवा उपासिका चालत असता जर कोणी अमनुष्य (पिशाच) यक्ष, यक्षिणी, यक्षाचा मुलगा , यक्षाची मुलगी, यक्षमहामात्य, यक्षसभासद, यक्षानुचर, गंधर्व, गंधर्वी, गंधर्वाचा मुलगा, गंधर्वाची मुलगी, गंधर्व महामात्य, गंधर्व सभासद, गंधर्व अनुचर, कुंभंड, कुंभंडीन, कुंभंडाचा मुलगा, कुंभंडाची मुलगी, कुंभंड महामात्य, कुंभंड सभासद, कुंभंड अनुचर, नाग, नागीन, नागाचा मुलगा, नागाची मुलगी, नाग महामात्य, नाग सभासद, नाग अनुचर दुष्ट चित्ताने त्याच्यामागून चालेल, उभा असता जवळ उभा राहिल, बसला असता शेजारी बसेल, निजला असता शेजारी निजेल -

न मे सो मारिस अमनुस्सो लभेय्य गामेसु वा निगमेसु वा सक्कारं वा गरूकारं वा, न मे सो मारिस अमनुस्सो लभेय्य आलकमन्दाय नाम राजाधानिया वत्थुं वा वासं वा न मे सो मारिस अमनुस्सो लभेय्य यक्खानं समितिं गन्तुं । अपिस्सु नं मारिस अमनुस्सा अनवय्हम्पि नं करेय्युं अविवय्हं । अपिस्सुनं, मारिस, अमनुस्सा अत्ताहिपि परिपुण्णाहि परिभासाहि परिभासेय्युं । अपिस्सुनं, मारिस अमनुस्सा रित्तम्पि पत्तं सीसे निक्कुज्जेय्युं । अपिस्सुनं, मारिस अमनुस्सा सत्तधापिस्स मुध्दं फालेय्युं ।

---

तर, मारिष (मित्रा), त्या अमनुष्याचा (पिशाचाचा) गावात अथवा शहरात सत्कार अथवा पूजा काहीही होणार नाही. त्यास आलकमन्दा राजधानीत वास अथवा स्थान मिळणार नाही. त्यास यक्षाच्या सभेत जाता येणार नाही. त्यांच्याशी कोणीही आवाहविवाहादिक संबंध ठेवणार नाही. सर्व पिशाचे भयानक रूपे दाखवून त्याची अगदी छी थू करून टाकतील. पिशाचे त्याच्या डोक्यावर रिक्त पात्र उघडे ठेवतील. पिशाचे त्याच्या डोक्याचे सात तुकडे करतील.

सन्ति हि मारिस अमनुस्सा चण्डा रु ध्दा रभसा, ते नेव महाराजानं आदियन्ति न महाराजानं पुरिसकानं आदियन्ति न महाराजानं पुरिसकानं पुरिसकानं आदियन्ति । ते खो ते मारिस अमनुस्सा महाराजानं अवरूध्दा नाम वुच्चन्ति ।

सेय्यथापि मारिस रञ्ञो मागधस्स विजिते चोरा । ते नेव रञ्ञो मागधस्स आदियन्ति, न रञ्ञो मागधस्स पुरिसकानं आदियन्ति, न रञ्ञो मागधस्स पुरिसकानं पुरिसकानं आदियन्ति । ते खो ते मारिस महाचोरा रञ्ञो मागधस्स अवरूध्दा नाम वुच्चन्ति ।

---

मारिष (मित्रा) काही पिशाचे भयंकर, रौद्र, दंगेखोर आहेत. ती महाराजास जुमानीत नाहीत. महाराजाच्या अंमलदारास जुमानीत नाहीत व त्याच्या हाताखालच्या लोकास जुमानीत नाहीत, मित्रा, ती महाराजांच्या उलट वागणारी आहे असे म्हणतात.ज्याप्रमाणे, मारिष, मगधदेशात राजाच्या राज्यात मोठे चोर आहेत. ते मगधदेशाच्या राजास जुमानीत नाहीत. त्याच्या अंमलदारास जुमानीत नाहीत व त्यांच्या हाताखालच्या लोकास जुमानीत नाहीत. ते महाचोर, मारिष, मगधराजाच्या उलट वागणारे आहेत असे म्हणतात.

एवमेव खो, मारिस सन्ति अमनुस्सा चण्डा रूध्दा रभसा, ते नेव महाराजानं आदियन्ति, न महाराजानं पुरिसकानं आदियन्ति, न महाराजानं पुरिसकानं पुरिसकानं आदियन्ति। ते खो ते मारिस अमनुस्सा महाराजानं अवरूध्दा नाम वुच्चन्ति।

यो हि कोचि मारिस अमनुस्सो यक्खो वा यक्खिनी वा यक्खपोतको वा यक्खपोतिका वा यक्खमहामत्तो वा यक्खपारिसज्जो वा यक्खपचारो वा, गन्धब्बो वा गन्धब्बी वा गन्धब्बपोतको वा गन्धब्बपोतिका वा गन्धब्बमहामत्तो वा गन्धब्बपारिसज्जो वा गन्धब्बपचारो वा, कुम्भण्डो वा कुम्भण्डी वा कुम्भण्डपोतको वा कुम्भण्डपोतिका वा कुम्भण्डमहामत्तो वा कुम्भण्डपारिसज्जो वा कुम्भण्डपचारो वा , नागो वा नागिनी वा नागपोतको वा नागपोतिका वा नागमहामत्तो वा नागपारिसज्जो वा नागपचारो वा पदुट्ठचित्तो भिक्खुं वा भिक्खुनिं वा उपासकं वा उपासिकं वा गच्छन्तं वा अनुगच्छेय, ठितं वा उपतिट्ठेय्य, निसिन्नं वा उपनिसीदेय्य, निपन्नं वा उपनिपज्जेय्य, ।

---

मित्रा, त्याप्रमाणेच हे अमनुष्य (पिशाच) भयंकर रौद्र, दंगेखोर आहेत, ती महाराजास जुमानीत नाहीत. महाराजाच्या अंमलदारास जुमानीत नाहीत व त्याच्या हाताखालच्या लोकास जुमानीत नाहीत, मित्रा, ती महाराजांच्या उलट वागणारी आहेत अंसे म्हणतात. मारिष जर कुणी पिशाच, यक्षिणी, यक्षाचा मुलगा, यक्षाची मुलगी, यक्षमहामात्य, यक्षसभासद, यक्षानुचर, गंधर्व, गंधर्वी, गंधर्वाचा मुलगा, गंधर्वाची मुलगी, गंधर्व महामात्य, गंधर्व सभासद, गंधर्व अनुचर, कुंभंड, कुंभंडीन, कुंभंडाचा मुलगा, कुंभंडाची मुलगी, कुंभंड महामात्य, कुंभंड सभासद, कुंभंड अनुचर, नाग, नागीन, नागाचा मुलगा, नागाची मुलगी, नाग महामात्य, नाग सभासद, नाग अनुचर, भिक्षू, भिक्षूणी, उपासक व उपासिका चालत असता दुष्ट चित्ताने यांच्यामागून चालेल, उभे असता जवळ उभे राहिल, बसले असता शेजारी बसेल, निजले असता शेजारी निजेल.

इमेसं यक्खानं महायक्खानं सेनापतीनं महासेनापतीनं उज्झापेतब्बं विक्कन्दितब्बं विरवितब्बं, अयं यक्खो गण्हाति, अयं यक्खो आविसति, अयं यक्खो हेठेति, अयं यक्खो विहेठेति, अयं यक्खो हिंसति, अयं यक्खो विहिंसति, अयं यक्खो न मुञ्चतीति ।

कतमेसं यक्खानं महायक्खानं सेनापतीनं महासेनापतीनं ? ।।३८।।

इन्दो सोमो वरूणो च भारव्दाजो पजापति,
चन्दनो कामसेट्ठो च, किन्नुघण्डु निघण्डु च ।।३९।।
पनादो ओपमञ्ञो च देवसूतो च मातलि,
चित्तसेनो च गन्धब्बो नलो राजा जनेसभो ।।४०।।
सातागिरो हेमवतो, पुण्णको करतियो गुलो,
सिवको मुचलिन्दो च वेस्सामित्तो युगन्धरो ।।४१।

---

तर त्यांनी यक्ष, महायक्ष, सेनापती, महासेनापती यांना कळवावे, त्यांना ओरडून त्यांजपाशी गाऱ्हाणे न्यावे की, ‘हा यक्ष मला धरतो आहे, हा यक्ष माझ्या शरीरात प्रवेश करितो आहे हा यक्ष मला त्रास देतो आहे, हा यक्ष मला फार त्रास देतो आहे, हा यक्ष मला मारतो आहे, हा यक्ष मला ठार मारतो आहे, हा यक्ष मला सोडीत नाही. कोणते यक्ष, महायक्ष, सेनापती, महासेनापती ?

इंद्र, सोम, वरूण, भारव्दाज, प्रजापती, चन्दन, कामसेट्ठ, किन्नुघण्ड, निघण्डु, पनाद, ओपमञ्ञ, देवांचा सूत मातली, चित्तसेन गंधर्व, नळ राजा, जनेसभ, सातागिर, हेमवत, पुण्णक, करतिय, गुळ, सीवक, मुचलिन्द, वेस्सामित्त, युगंधर, गोपाल, सुप्पगेध, हिरी, नेत्ती, मन्दिय,

गोपालो सुप्पगेधो च हिरिनेत्ती च मन्दियो,
पञ्चालचण्डो आलवको पज्जुन्नो सुमनो सुमुखो,
दधीमुखो मणि मणिचरो दीघो अथो सेरिस्सको सह ।।

इमेसं यक्खानं महायक्खानं सेनापतीनं महासेनापतीनं उज्झापेतब्बं विक्कन्दितब्बं विरवितब्बं, अयं यक्खो गण्हाति, अयं यक्खो आविसति, अयं यक्खो हेठेति, अयं यक्खो विहेठेति, अयं यक्खो हिंसति, अयं यक्खो विहिंसति, अयं यक्खो न मुञ्चतीति ।

अयं खो सा मारिस आटानाटीया रक्खा भिक्खूनं भिक्खुनीनं उपासकानं उपासिकानं गुत्तिया रक्खाय अविहिंसाय फासुविहारायाति । हन्द च दानि मयं मारिस गच्छाम बहुकिच्चा मयं बहुकरणीयाति । यस्सादानि तुम्हे महाराजानो कालं मञ्ञथाति ।

---

पंचालचंड, आळवक, पुज्जन्न, सुमन, सुमुख, दधिमुख, मणि, चर, दीघ व सेरिसक्क, हे यक्ष, महायक्ष, सेनापती, महासेनापती यांना कळवावे त्यांना ओरडून सांगावे, त्यांचपाशी गाऱ्हाणे न्यावे की हा यक्ष मला धरतो आहे. हा यक्ष माझ्या शरीरात प्रवेश करीतो आहे, हा यक्ष मला त्रास देतो आहे. हा यक्ष माझ्या शरीरात प्रवेश करीतो आहे, हा यक्ष मला फार त्रास देतो आहे, हा यक्ष मला मारतो आहे, हा यक्ष मला ठार मारतो आहे. हा यक्ष मला सोडीत नाही.

मारिष, भिक्षू, भिक्षूणी, उपासक, उपासिका यांचे गोपन, व रक्षण व्हावे, त्यास कोणी त्रास देऊ नये व त्यांनी सुखाने वास करावा यासाठी ही आटानाटीय रक्षा आहे. तर आता, मारिष, आम्ही जातो, आम्हांस पुष्कळ कामे आहेत. ठीक आहे. जशी तुमची मर्जी, महाराजांनो !

